॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

श्रीगणेशाय नमः ।

# गीता-माधुर्य

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥
जिज्ञासापूर्तये टीका लिखिता साधकस्य या ।
संजीवनीप्रवेशाय माधुर्यं लिख्यते मया ॥

## अध्याय पहिला

पांडवांनीं बारा वर्षांचा वनवास व एक वर्षाचा अज्ञातवास संपविल्यावर पूर्वप्रतिज्ञेनुसार जेव्हा दुर्योधनाकडे आपले अर्धे राज्य मागितले, तेव्हा त्याने सांगितले की, अर्धे राज्य तर काय, पण तीक्ष्ण सुईच्या टोकावर बसेल इतकीहि जमीन मी युद्धाशिवाय देणार नाही, म्हणून पांडवांनी कुन्तीमातेच्या आज्ञेनुसार युद्ध करण्याचे निश्चित केले. याप्रकारे पांडव व कौरव यांच्यामध्ये युद्ध होणार हे निश्चित झाले आणि दोन्ही बाजूंनी युद्धाची तयारी सुरू झाली.

महर्षि वेदव्यासांचे धृतराष्ट्रावर फार प्रेम होते त्या प्रेमास्तव धृतराष्ट्राजवळ येऊन ते म्हणाले की,'युद्ध होणार व त्यांत क्षत्रियांचा महान संहार होणार' हे अपरिहार्य आहे, कोणीहि टाळू शकत नाही. जर तुला युद्ध पाहण्याची इच्छा असेल तर मी तुला दिव्य दृष्टी देऊ शकतो ज्या दृष्टीने तू इथे बसल्या-बसल्या युद्ध चांगल्याप्रकारे पाहू शकसील. यावर धृतराष्ट्र म्हणाला की, मी जन्मभर आंधळा राहिलो आता आपल्या कुळाचा संहार पाहू इच्छित नाही, परंतु युद्ध कसे होत आहे, हा समाचार

जरुर जाणू इच्छितो. तेव्हा व्यास म्हणाले की, मी संजयास दिव्य दृष्टी देतो, मग तो हे युद्ध, सर्व घटना तसेच सैन्यांच्या मनात आलेली गोष्टही जाणू शकेल, ऐकू शकेल व पाहू शकेल आणि तुलाही सर्व गोष्टी सांगेल, असे म्हणून व्यासांनी संजयास दिव्य दृष्टी दिली. तिकडे कुरुक्षेत्रावर निश्चित समयानुसार दोन्हीहि सेना युद्धाकरिता तयार होत्या.

आता प्रश्न असा निर्माण होतो की, जर युद्धाकरिता दोन्हीहि सेना तयार होत्या, तर मग अशा मोक्यावर भगवंताने अर्जुनास गीतेचा उपदेश का केला ? तर शोक दूर करण्याकरिताच भगवंताने अर्जुनास गीतेचा उपदेश केला.

**अर्जुनास शोक केव्हां झाला आणि का झाला ?**

जेव्हा अर्जुनाने दोन्ही सैन्यामध्ये आपल्याच जवळच्या कुटुंबियांना पाहिले आणि विचार केला की, दोन्हीहि बाजूस आमचेच कुटुंबी मरतील. तेव्हा त्याला शोक झाला आणि तो ममतेमुळे झाला.

**अर्जुनाने दोन्ही सैन्यांमध्ये आपल्या कुटुम्बीयांना का पाहिले ?**

भगवान् श्रीकृष्ण जेव्हा दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी रथ उभा करून अर्जुनास म्हणाले की, तू युद्धाच्या इच्छेने एकत्रित जमलेल्या या कुरुवंशियांना पहा, तेव्हा अर्जुनाने आपल्या कुटुंबियांना पाहिले,

**भगवंताने दोन्ही सैन्यांमध्ये तू कुरुवंशियांना पहा असें का सांगितले ?**

अर्जुनानें भगवंतास अगोदर असे सांगितले होते की, हे अच्युता ! माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा कर, म्हणजे येथे माझ्याबरोबर दोन हात करणारे कोण आहेत, ते मी पाहीन.

**अर्जुनाने असे का सांगितले ?**

जेव्हा युद्धाच्या तयारीची वाद्ये वाजली, तेव्हा उत्साहात येऊन अर्जुनाने दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी रथ उभा करण्यास सांगितले.

**वाद्ये का वाजली ?**

कौरव सेनेचे मुख्य सेनापती भीष्म यांनी जेव्हा सिंहाच्या समान गर्जना करून शंख वाजविला, तेव्हा कौरवसेनेची वाद्ये वाजली आणि पांडवांचीही वाद्ये वाजली .

**भीष्मांनी शंख का वाजविला ?**

दुर्योधनास आनंदीत करण्यासाठी भीष्मांनी शंख वाजविला .

**दुर्योधन अप्रसन्न का होता ?**

दुर्योधन गुरू द्रोणाचार्य यांचेजवळ जाऊन म्हणाला की, आपल्या प्रतिपक्षांत पांडवांची सेना उभी आहे ती पहा अर्थात् ज्या पांडवांवर आपण प्रेम ठेवता तेच आपल्या विरोधात उभे आहेत, शिवाय पांडवांची व्यूहरचनाही धृष्टद्युम्नद्वारा केली गेली आहे, जो तुम्हाला मारण्यासाठीच उत्पन्न झालेला आहे, याप्रकारे दुर्योधनाच्या चलाखीने, राजनीतीने भरलेल्या तीक्ष्ण गोष्टी ऐकल्या तेव्हा द्रोणाचार्य गप्प राहिले, काहीच बोलले नाही, यामुळें दुर्योधन अप्रसन्न होता .

**द्रोणाचार्य गप्प का राहिले ?**

दुर्योधन द्रोणाचार्यांना उत्तेजित करण्यासाठी चलाखीने ज्या राजनीतीच्या गोष्टी बोलला, त्या गोष्टी द्रोणाचार्यांना वाईट लागल्या . त्यांनी असा विचार केला की, जर मी या गोष्टींचे खंडन करीन तर युद्धाच्या मोक्यावर आपसामध्यें खटका उडेल व तो उचित नाहीं— तसेंच मी या गोष्टींना अनुमोदनही देऊ शकत नाही, कारण हा चलाखीने गोष्टी करीत आहे, सरळतेने नाही, याकरिता द्रोणाचार्य गप्प राहिले .

**दुर्योधन अशा गोष्टी केव्हा बोलला व का बोलला ?**

दुर्योधन व्यूहाकार उभ्या असलेल्या पांडवसेनेस पाहून गुरू द्रोणाचार्यास उत्तेजित करण्यासाठी अशा गोष्टी बोलला . याचे वर्णन संजयाने धृतराष्ट्राजवळ केले आहे

**संजयाने धृतराष्ट्राजवळ हे वर्णन का केले ?**

धृतराष्ट्राने जेव्हा युद्धाची कथा आरंभापासून विस्तारपूर्वक ऐकण्याची इच्छा केली, तेव्हा संजयाने या सर्व गोष्टी धृतराष्ट्रास सांगितल्या.

**धृतराष्ट्राने संजयाकडून ऐकण्याची इच्छा का केली ?**

युद्धाचे दहा दिवस झाल्यानन्तर संजयाने धृतराष्ट्रास अचानक येऊन असे सांगितले की, कौरव-पाण्डवांचे पितामह व शान्तनुचे पुत्र भीष्म युद्धात मारले गेले, (रथातून खाली पाडले गेले) जे संपूर्ण योद्ध्यांमध्ये मुख्य आणि धनुर्धाऱ्यांमध्ये श्रेष्ठ होते असे पितामह भीष्म, आज शर-शय्येवर झोपले आहेत. हा समाचार ऐकून धृतराष्ट्रास फार दुःख झाले आणि तो विलाप करू लागला. पुन्हा तो संजयास युद्धाचा सर्व वृत्तान्त ऐकविण्यासाठी म्हणाला आणि विचारले की,—

**हे संजया ! धर्मभूमी कुरुक्षेत्रामध्ये युद्धाच्या इच्छेने एकत्र झालेल्या माझ्या आणि पाण्डूच्या पुत्रांनी काय केले ? ॥ १ ॥**

संजय म्हणाला, त्यावेळी व्यूहरचनेने उभी असलेली पांडवांची सेना पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्याजवळ गेला आणि म्हणाला की, हे आचार्य ! आपण, आपल्या बुद्धिमान शिष्य द्रुपदपुत्र-धृष्टद्युम्नद्वारा व्यूहरचनेने उभी केलेली पांडवांची ही मोठी सेना पहा ॥ २ ॥

**दुर्योधना ! मी पांडवांच्या सेनेमध्ये कोणा-कोणास पाहू ?**

पांडवांच्या या सेनेमध्ये मोठे-मोठे शूरवीर आहेत. ज्यांची मोठी-मोठी धनुष्ये आहेत, त्याचप्रमाणे जे बळामध्ये भीमासमान आणि युद्धकलेमध्ये अर्जुनासमान आहेत. त्यांच्यात युयुधान (सात्यकि), राजा विराट आणि महारथी द्रुपदही आहे. धृष्टकेतु, चेकितान आणि पराक्रमी काशिराजही आहे. पुरुजित् आणि कुन्ति-भोज हे दोघे भाऊ तसेच मनुष्यांमध्ये श्रेष्ठ शैब्यही आहे. पराक्रमी युधामन्यु आणि बलवान उत्तमौजाही आहे. सुभद्रापुत्र अभिमन्यु आणि द्रौपदीचे पाच पुत्रही

आहेत. सर्वच्या-सर्व महारथी आहेत. ॥ ४—६ ॥

**दुर्योधना ! पांडवांच्या सैन्यांतील शूरवीरांची नावे तर तू सांगितली पण आपल्या सैन्यांतील शूरवीर कोण-कोण आहेत ?**

हे द्विजोत्तमा ! आमच्या सेनेमध्ये जे विशेष-विशेष पुरुष आहेत त्यांच्यावरही आपण ध्यान द्या. आपण (द्रोणाचार्य), पितामह भीष्म, कर्ण, संग्रामविजयी कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण आणि सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा त्याचप्रमाणे यांच्याशिवाय आणखीहि पुष्कळ असे शूरवीर आहेत की, ज्यांनी माझ्याकरिता आपल्या जगण्याच्या इच्छेचाही त्याग केला आहे आणि जे अनेक प्रकारची अस्त्र-शस्त्रे चालविण्यात निपुण आहेत तसेच युद्धकलेमध्ये अत्यन्त चतुर आहेत. ॥ ७—९ ॥

**हे संजया ! दोन्ही सेनेंतील प्रधान-प्रधान योद्ध्यांना दाखविल्यानंतर दुर्योधनानें काय केले ?**

दुर्योधनाने आपल्या मनात विचार केला की, उभयपक्षपाती (दोघांचाहि पक्ष घेणाऱ्या) भीष्मद्वारा रक्षिलेली आमची सेना पांडव-सैन्यावर विजय मिळविण्यास असमर्थ आहे आणि निजपक्षपाती (केवळ आपलाच पक्ष घेणाऱ्या) भीमद्वारा रक्षिलेली पांडवांची सेना आमच्या सेनेवर विजय मिळविण्यास समर्थ आहे. ॥ १० ॥

**मनात असा विचार केल्यानंतर दुर्योधनाने काय केले ?**

त्याने सर्व शूर-वीरांना म्हटले की, आपण सर्वच्या सर्व लोकांनी आपापल्या नियोजित मोर्चावर दृढतेने राहूनच पितामह भीष्मांचे चारही बाजूंनी रक्षण करावे* . ॥ ११ ॥

---

* दुर्योधन हे जाणत होता की, द्रोण आणि भीष्म उभयपक्षपाती आहेत म्हणून त्यांना खुश करून केवळ आपल्याच पक्षात आणण्यासाठी दुर्योधन जसा प्रथम द्रोणाचार्यांजवळ गेला तसेच येथेहि भीष्मांना खूश करण्यासाठी सर्व वीरांना भीष्मांचे रक्षण करण्याचे सांगत आहे.

**आपल्या रक्षणाची गोष्ट ऐकून पितामह भीष्मांनी काय केले ?**

दुर्योधनास प्रसन्न करीत पितामह भीष्मांनी सिंहासमान गर्जना करून मोठ्या जोराने शंख वाजविला. ॥ १२ ॥

**संजया ! भीष्मांनी शंख वाजविल्यावर काय झाले ?**

भीष्मांनी तर दुर्योधनास प्रसन्न करण्याकरिताच शंख वाजविला होता. परंतु कौरवसेनेने ती युद्धारंभाची घोषणाच समजली म्हणून भीष्मांचा शंख वाजताच कौरवसेनेची शंख, भेरी, ढोल, मृदंग इत्यादी वाद्ये एकाच वेळी वाजू लागली. त्यांचा आवाज मोठा भयंकर झाला. ॥ १३ ॥

**संजया ! कौरवसेनेची वाद्ये वाजल्यानंतर काय झाले ?**

कौरवसेनेची वाद्ये वाजल्यानंतर पांडव सेनेची वाद्ये वाजायला हवी होती. परंतु त्या सेनेस कोणतीच आज्ञा मिळाली नाही, त्यावेळी ज्या रथास सफेद घोडे जुंपलेले आहेत, अशा महान रथावर बसलेल्या भगवान् श्रीकृष्णांनी 'पांचजन्य' नावाचा आणि अजुर्नाने ' देवदत्त' नावाचा शंख मोठ्या जोरानें वाजविला. त्यानंतर भीमाने 'पौण्ड्र' नावाचा, युधिष्ठिराने 'अनंतविजय' नावाचा, नकुलाने' सुघोष' नावाचा आणि सहदेवाने' मणिपुष्पक' नावाचा शंख वाजविला. ॥ १४—१६ ॥

**त्यानंतर आणखी कोणी शंख वाजविले ?**

हे राजा ! त्यानंतर पांडवसेनेचे श्रेष्ठ धनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, तसेच धृष्टद्युम्न, राजा विराट, अजिंक्य सात्यकि, राजा द्रुपद, द्रौपदीचे पाच पुत्र पाणि अजानुबाहु सुभद्रापुत्र अभिमन्यु या सर्व महारथ्यांनी आप-आपले शंख वाजविले. ॥ १७-१८ ॥

**पांडवसेनेच्या त्या शंखध्वनीचा परिणाम काय झाला ?**

पांडवसेनेच्या त्या भयंकर शंखध्वनीने आकाश आणि पृथ्वीस दुमदुमून टाकून अन्यायपूर्वक राज्य गिळू पाहणाऱ्या कौरवांची हृदये विदीर्ण केली. ॥ १९ ॥

**संजया ! पांडवांनी शंख वाजविल्यानंतर काय केले ?**

हे महिपते ! शंख वाजविल्यानंतर युद्धाच्या आरंभी कपिध्वज अर्जुनाने आपल्या संबंधियांना (कौरवांना) पाहून आपले गांडीव धनुष्य उचलले आणि अन्तर्यामी भगवान श्रीकृष्णास म्हणाला की, हे अच्युता ! आपण माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा करा. ॥ २० ॥

**हे अर्जुना ! मध्यभागी रथ का उभा करू ?**

मी या रणभूमीमध्ये उभ्या असलेल्यां, युद्धाची इच्छा करणाऱ्या या शूरवीरांना पाहीन की, मला कोणा-कोणाबरोबर युद्ध करायचे आहे. या युद्धामध्ये दुष्टबुद्धी दुर्योधनाचे प्रिय करण्याच्या इच्छेने जे राजेलोक एकत्र झाले आहेत, त्यांनाही मी पाहीन. ॥ २२-२३ ॥

**संजया ! अर्जुनाने असे म्हटल्यावर भगवंताने काय केले ?**

संजय म्हणाला, हे राजा ! निद्राविजयी अर्जुनाने असे म्हटल्यावर अन्तर्यामी भगवान् श्रीकृष्ण दोन्ही सैन्याच्या मध्यभागी पितामह भीष्म आणि द्रोणाचार्य यांच्यासमोर तसेच सर्व राजांच्यासमोर रथ उभा करून म्हणाले की, हे पार्था ! तूं या एकत्र झालेल्या कुरुवंशियांना पहा. ॥ २४-२५ ॥

**भगवंतांनी असे म्हटल्यावर काय झाले ?**

तेव्हा तेथे दोन्ही सेनेमध्ये असलेल्या पितृतुल्य चुलता, आजोबा गुरू, मामा, भाऊ, पुत्र, नातू, मित्र, सासरे आणि सुहृद् इत्यादी आणखीही काही संबंधियांना पाहून अर्जुन अत्यन्त करुणायुक्त होऊन शोक करीत म्हणाला.

**संजया ! अर्जुन काय म्हणाला ?**

अर्जुन म्हणाला की. हे श्रीकृष्णा ! आपल्या खास कुंटुंबियांना युद्धाकरिता समोर उभे असलेले पाहून माझी सर्व गात्रे शिथिल होत आहेत. तोंड कोरडे पडत आहे. सर्वांगाचा थरकाप झाला आहे. शरीरावर रोमांच उठले आहेत. गांडीव धनुष्य हातातून पडत आहे आणि सर्व अंगाचा दाह होत आहे. माझे मन भ्रमिष्टासारखे झाले आहे. आणि मी

उभा राहण्यासही असमर्थ झालो आहे. ॥ २६-३० ॥

**अर्जुना ! याशिवाय आणखी काय पाहत आहेस ?**

हे केशवा ! मी विपरीत लक्षणे पाहत आहे आणि युद्धामध्ये या कुटुंबियांना मारून मला कोणताही लाभ दिसत नाही ॥ ३१ ॥

**यांना मारल्याशिवाय राज्य कसे मिळणार ?**

हे कृष्णा ! मी विजय इच्छित नाही, राज्य इच्छित नाही, तसेच सुखेही इच्छित नाही. हे गोविंदा ! आम्हास राज्य, भोग अथवा जगणे यापासून काय लाभ आहे ? ॥ ३२ ॥

**तू विजय इत्यादी का इच्छित नाहीस ?**

आम्ही ज्यांच्याकरिता राज्य, भोग आणि सुखे इच्छित आहोत, तेच हे सर्वच्या सर्व लोक आपल्या प्राणांची आणि धनाची आशा सोडून युद्धाकरिता उभे आहेत. ॥ ३३ ॥

**अर्जुना ! ते लोक कोण आहेत ?**

गुरू, चुलते, पुत्र, आजोबा, मामा,सासरे, नातू, मेहुणे, तसेच आणखीही पुष्कळ संबधित आहेत ॥ ३४ ॥

**हेच लोक जर तुला मारण्याकरिता तयार झाले तर ?**

हे भले मला मारोत, परंतु हे मधुसूदना ! मला त्रैलोक्याचे राज्य जरी मिळाले, तरी मी त्यांना मारू इच्छित नाही, तर मग पृथ्वीच्या राज्याच्या बाबतीत काय बोलायचे ? ॥ ३५ ॥

**अरे भाऊ राज्य मिळाल्यानंतर तर मोठी प्रसन्नता प्राप्त होते, ती प्रसन्नताही तू इच्छित नाही काय ?**

हे जनार्दना ! या धृतराष्ट्राच्या संबंधियांना (की. जे आमचेहि संबंधी आहेत) मारून आम्हाला काय प्रसन्नता लाभणार ? या आततायींना मारल्यावर आम्हाला पापच लागणार. तेव्हा हे माधवा ! म्हणून मी या धृतराष्ट्रसंबंधियांना मारू इच्छित नाही, कारण की, हे माधवा ! आमच्याच

कुटुंबियांना मारून आम्ही सुखी कसे होणार ? ॥ ३६-३७ ॥

**हे तर तुला मारण्यासाठी तयारच आहेत मग तूच का मागे सरतोस ?**

महाराज ! लोभामुळे यांची विवेकबुद्धी-विचारशक्ती नष्ट झालेली आहे. म्हणून हे दुर्योधन इत्यादी कुलनाशापासून होणाऱ्या दोषाचा आणि मित्रद्रोहापासून होणाऱ्या पापाचा विचार करीत नाहीत. तरीसुद्धा हे जनार्दना ! कुलक्षयापासून उद्भवणाऱ्या दोषांना जाणणाऱ्या आम्ही तरी ह्या पापापासून वांचले पाहिजे अर्थात् दूर राहिले पाहिजे ॥ ३८-३९ ॥

**जर कुलाचा नाशही झाला तर काय होणार ?**

कुलाचा नाश झाल्यावर वंशपरंपरेने चालत आलेले कुलधर्म नष्ट होतात.

**कुलधर्म नष्ट झाल्यावर काय होते ?**

कुलधर्म नष्ट झाल्यावर संपूर्ण कुलांत अधर्म पसरला जातो. ॥ ४० ॥

**अधर्म पसरला तर काय होते ?**

अधर्माचा प्रसार झाल्यामुळे कुलांतील स्त्रीया दूषित होतात.

**स्त्रीया दूषित झाल्यामुळे काय होते ?**

स्त्रीया दूषित झाल्यामुळे वर्णसंकर निर्माण होतो. ॥ ४१ ॥

**वर्णसंकर निर्माण होण्याने काय होते ?**

तो वर्णसंकर कुळाचा नाश करणा-यांना अणि संपूर्ण कुळाला नरकाला नेणारा होतो. तसेच पिण्डदान आणि श्राद्धतर्पण न मिळाल्यामुळे त्यांचे पितरही आपल्या स्थानापासून पतन पावतात, वर्णसंकर निर्माण करणाऱ्या या दोषांमुळें कुलघातक्यांचे वंशपरंपरेने चालत आलेले सनातन कुलधर्म व ज्ञातीधर्म हे दोन्हीहि नष्ट होतात. ॥ ४२-४३ ॥

**ज्यांचे कुलधर्म नष्ट होतात त्या मनुष्यांचे काय होते ?**

हे जनार्दना ! त्या मनुष्यांना दीर्घकालपर्यंत नरकामध्ये वास्तव्य करावे लागते. असे आम्ही ऐकत आलो आहोत. ॥ ४४ ॥

**युद्धाचे हे सर्व परिणाम जर तुला प्रथमपासूनच ज्ञात आहेत तर तू युद्धाकरिता तयारच का झालास ?**

हीच तर मोठी आश्चर्याची व खेदाची गोष्ट आहे की, आम्ही फार मोठे पाप करण्याचा निश्चय करून बसलो आहोत. तो म्हणजे आम्ही राज्य आणि सुखाच्या लालसेनें स्वकुटुंबियांना मारण्यास तयार झालो आहोत. ॥ ४५ ॥

**आता तुझी काय करण्याची इच्छा आहे ?**

मी अस्त्र-शस्त्र टाकून युद्धापासून परावृत्त होईन, जरी मी असे केल्यानंतरही जर दुर्योधन इत्यादी मला मारतील तर ते मारणेही माझ्याकरिता मोठे हितकारकच होईल. ॥ ४६ ॥

**संजय ! असे म्हटल्यानंतर अर्जुनाने काय केले ?**

संजय म्हणाला. असे म्हटल्यावर शोकाने ज्याचे मन अतिशय व्याकुळ झाले आहे असा तो अर्जुन बाणासहीत धनुष्याचा त्याग करून रथाच्या मध्यभागी बसला. ॥ ४७ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय दुसरा

**संजय ! रथाच्या मध्यभागी बसल्यानंतर अर्जुनाची काय अवस्था झाली ?**

संजय म्हणाला—हे राजा ! जो मोठ्या उत्साहाने युद्ध करण्याकरिता आला होता. परंतु मोहामुळे तो विषाद करीत आहे आणि त्याच्या डोळ्यात एवढे अश्रू भरून आले आहेत की, त्याला डोळ्यांनी दिसणेही कठीण झाले आहे. अशा अर्जुनाला भगवान मधुसूदन म्हणाले की, हे अर्जुना ! अशा अयोग्य ठिकाणी तुझ्यामध्ये हा मोह कोठून आला ? हा मोह श्रेष्ठ पुरूषांकडून धारण करण्यालायक नाही, स्वर्ग देणारा नाही आणि कीर्ती करणाराही नाही. याकरिता हे पार्था ! तू ह्या नपुंसकतेला आपल्यामध्ये येऊ देऊ नकोस. कारण तुझ्यासारख्या पुरुषामध्ये ही नपुंसकता येणे उचित नाहीं. म्हणून हे परंतपा ! हृदयाची ही तुच्छ दुर्बलता सोडून तू युद्धाकरिता उभा रहा. ॥ १—३ ॥

**संजय ! भगवान् श्रीकृष्णाचे हे बोलणे ऐकून अर्जुन काय म्हणाला ?**

अर्जुन म्हणाला, महाराज ! मी मरणास थोडाच भितो आहे. मी तर मारण्यास घाबरतो आहे. हे अरिसूदना ! हे भीष्म आणि द्रोण तर पूजनीय आहेत. याकरिता हे मधुसूदना ! अशा पूज्य जणांना कटु शब्दही बोलू नयेत. मग त्यांच्याबरोबर मी बाणांनी युद्ध कसे करू ? ॥ ४ ॥

**अरे भैय्या ! केवळ कर्तव्य पालन करीत असता दुसरेहि काही पाहिले जाते काय ?**

महाराज ! मी या मनुष्यलोकामध्ये महानुभाव गुरूजनांना न मारता भिक्षान्नावर जीवननिर्वाह करणे श्रेष्ठ समजतो. जर आपल्या म्हणण्यानुसार

मी जर युद्ध केले तर गुरुजनांना मारून त्यांच्या रक्ताने माखलेले, धनाची व कामनेची ज्यात मुख्यता आहे असे भोगच तर भोगीन. त्याच्यापासून मला शांती थोडीच मिळेल ? ॥ ५ ॥

**तर मग तू काय करणे ठीक समजतोस ?**

हे भगवन् ! युद्ध करणे योग्य आहे की, युद्ध न करणे योग्य आहे आम्ही हे काही समजू शकत नाही. त्याचप्रमाणे युद्धामध्ये आम्ही त्यांना जिंकू का ते आम्हाला जिंकतील हेही आम्ही जाणत नाही. सर्वात मोठी गोष्ट तर ही आहे की, भगवन्ता ! ज्यांना मारून आम्ही जगूही इच्छित नाही, तेच हे धृतराष्ट्राचे संबंधी युद्धात आमच्यासमोर उभे आहेत तर मग आम्ही त्यांना कसे मारावे ? ॥ ६ ॥

**जर तू निर्णय घेऊ शकत नाहीस, तर मग तू काय उपाय योजिला आहेस ?**

हे महाराजा ! मोहरूपी दोषामुळे माझा क्षात्रस्वभाव दबला गेला आहे आणि माझी बुद्धी धर्मविषयक निर्णय घेण्याबाबत काम करू शकत नाही. याकरिता ज्याने माझे निश्चित कल्याण होईल अशी गोष्ट मला सांगा. मी आपला शिष्य आहे आणि मी तुम्हाला शरण आलो आहे. तुम्ही मला उपदेश करा. परंतु महाराज ! आपण प्रारंभी जसे युद्ध करण्यास सांगितले होते तसे पुन्हा सांगू नका. कारण युद्ध केल्याने मला येथील धनधान्याने संपन्न आणि निष्कण्टक असे राज्य मिळेल, अथवा देवतांचे अधिपत्य मिळेल तरीहि इंद्रियांना शुष्क करणारा हा शोक दूर होईल असे मला वाटत नाही. ॥ ७-८ ॥

**संजया ! पुन्हा काय झाले ?**

संजय म्हणाला—हे राजा ! निद्राविजयी अर्जुन अन्तर्यामी भगवान श्रीकृष्णास ''मी युद्ध करणार नाहीं'' असे स्पष्ट सांगून गप्प झाला. ॥ ९ ॥

**अर्जुन गप्प झाल्यावर भगवान श्रीकृष्ण काय म्हणाले ?**

अन्तर्यामी भगवान श्रीकृष्ण दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी विषाद करणाऱ्या अर्जुनास मन्द स्मितहास्य करीत म्हणाले की, तू शोक करण्यास योग्य नसणाऱ्यांचा शोक करीत आहेस आणि पांडित्यासारख्या मोठ्या मोठ्या गप्पा मारतो आहेस परंतु जे मेलेले आहेत त्यांच्याकरिता आणि जे जीवंत आहेत त्यांच्याकरितासुद्धा पंडितलोक शोक करीत नाहीत. ॥ १०-११ ॥

**भगवन् ! पंडितलोक शोक का करीत नाहीत ?**

मी, तू आणि हे राजेलोक पूर्वी नव्हते असे पण नाही आणि आम्ही सर्व पुढे राहणार नाही असेही नाही. अर्थात् आम्ही सर्व पुर्वीहि होतो आणि पुढेही राहणार, असे जाणून पंडितलोक शोक करीत नाहीत. ॥ १२ ॥

**ही गोष्ट कशी समजून घेता येईल ?**

अरे अर्जुना ! देह धारण करणाऱ्यांच्या या शरिरामध्ये ज्याप्रमाणे कौमार्य, तारुण्य आणि वृद्धावस्था असते. त्याचप्रमाणे देहधाऱ्यास दुसऱ्या शरिराची प्राप्ती होते. याविषयी पंडितलोक मोहित होत नाहीत ॥ १३ ॥

**कौमार्य इत्यादी अवस्था शरिराच्या होतात, हे ठीक आहे. परंतु अनुकूल प्रतिकूल, सुख दुःख देणारे पदार्थ जर समोर आले तर हे देवा, त्यावेळी काय करावे ?**

हे कुन्तीनंदना ! इंद्रियांचे जेवढे विषय आहेत ते सर्व अनुकूलता व प्रतिकूलता याद्वारे सुख आणि दुःख देणारे आहेत. परंतु ते येणारे जाणारे आणि अनित्यच आहेत. याकरितां हे अर्जुन ! त्यांना तू सहन कर अर्थात् त्यांच्यामध्ये तू निर्विकार रहा. ॥ १४ ॥

**त्यांना सहन करण्याने, त्यांच्यामध्ये निर्विकार राहण्याने काय लाभ होतो ?**

हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना ! सुखदुःखामध्ये समान (निर्विकार) राहणाऱ्या

ज्या धैर्यवान पुरुषास या इंद्रियांचे विषय (जडपदार्थ) सुखी किंवा दुःखी करीत नाहीत, तो स्वतःसिद्ध अमरतेचा (परमात्मप्राप्तीचा) अनुभव घेत असतो. ॥ १५ ॥

**तो अमरतेचा अनुभव कोणत्या प्रकारे घेत असतो ?**

सत् च्या (चेतन तत्त्व) सत्तेचा कधी अभाव होत नाही आणि असत् ची (जड पदार्थ) सत्ताच नसते. या दोन्हींच्या तत्त्वाला तत्त्वदर्शी (ज्ञानी) महापुरुष जाणत असतो.म्हणून ज्ञानी महापुरुष अमर होतात. ॥ १६ ॥

**भगवन् ! ते सत् (अविनाशी) तत्त्व काय आहे ?**

ज्याने हे सम्पूर्ण जगत् व्यापलेले आहे, त्याला तू अविनाशी समज. ह्या अविनाशी तत्त्वाचा कोणीहि नाश करू शकत नाही. ॥ १७ ॥

**भगवन् ! असत् (विनाशी) तत्त्व काय आहे. ?**

ह्या अविनाशी, अप्रमेय, आणि नित्य राहणाऱ्या शरीरीची ही सर्व शरीरे अन्तवान-नाशवान आहेत. म्हणून हे अर्जुना ! तू तुझ्या युद्धरूप कर्तव्यकर्माचे पालन कर. ॥ १८ ॥

**युद्धामध्ये तर मरणे आणि मारणे असते, म्हणून जर शरीरीला मरणारा मारणारा मानले तर ?**

जो ह्या अविनाशी शरीरीला शरीरांप्रमाणे मरणारा मानतो आणि जो याला मारणारा मानतो ते दोघेहि बरोबर जाणत नाहीत. कारण की, हा कोणाला मारत नाही आणि स्वतःही मारला जात नाही. ॥ १९ ॥

**भगवन् ! हा शरीरी मरणारा कां नाही ?**

हा शरीरी कधी उत्पन्न होत नाही आणि कधी मरतही नाही. हा जन्म घेऊन अस्तित्वाला येणारा नाही. हा जन्मरहित, नित्य निरंतर राहणारा, शाश्वत आणि अनादी आहे. शरीराला मारले गेल्यानंतरही हा शरीरी मारला जात नाही. ॥ २० ॥

**शरीरीला अशाप्रकारे जाणल्यानें काय होणार ?**

हे पार्था ! जो मनुष्य या शरीरीला अविनाशी, नित्य, जन्मरहित आणि अव्यय अशाप्रकारे जाणतो तो कसे कोणाला मारील ? आणि कसे कोणाला मारविणार ? ॥ २१ ॥

**भगवन ! तर मग कोण मरत असतो ?**

अरे भैय्या ! शरीर मरत असते. मनुष्य ज्याप्रमाणे जुनी कपड़े टाकून नवीन कपडे धारण करतो. त्याचप्रमाणे हा शरीरी जुन्या शरीराचा त्याग करून दुसऱ्या नवीन शरीरात जात असतो. ॥ २२ ॥

**नवीन नवीन शरीराला धारण केल्यामुळे शरीरीमध्यें कोणता ना कोणता तरी विकार येतच असेल ?**

नाही, शरीरीमध्ये कधीही कोणताही विकार येत नाही. या शरीरीला शस्त्र कापू शकत नाही, अग्नी जाळू शकत नाही, पाणी ओले करू शकत नाही, वायु सुकवू शकत नाही. ॥ २३ ॥

**हा शस्त्राने कापला, अग्नीने जाळला, पाण्याने ओला केला किंवा वायूने सुकवला का जात नाही ?**

हा शरीरी कापलाही जात नाही, जाळला पण जात नाही, ओला पण केला जात नाही आणि सुकवला पण जात नाही. कारण की, हा शरीरी नित्य राहणारा, सर्वांत परिपूर्ण, स्थिर स्वभाववान, अचल आणि अनादी आहे. हा आत्मा इंदियादिकांचा विषय नाही. अर्थात् हा प्रत्यक्ष दिसत नाही. हा अन्तःकरणाचाही विषय नाही आणि याच्यात कोणताही विकारसुद्धा होत नाही. म्हणून या शरीरीला अशाप्रकारे जाणून तू शोक करू नये. ॥ २४ ॥

**या शरीरीला निर्विकारी मानले तर शोक होऊ शकत नाही. पण याला विकारी मानले तर शोक होणारच ?**

हे अजानबाहो ! जर तू या शरीरीला नित्य जन्म घेणारा किंवा नित्य मरणाराही मानले तरीसुद्धा तू शोक करणे व्यर्थ आहे. कारण की,

जो जन्मला आहे तो जरूर मरणार तसेच जो मेला आहे तो जरूर जन्म घेणार, या नियमाला कोणी बाजूला सारू शकत नाही म्हणून शरीरीकरिता तू शोक करता कामा नये. ॥ २६-२७ ॥

**भगवन् ! शरीरीच्या अनुषंगाने शोक करू नये हे तर ठीक आहे परंतु शरीराच्या अनुषंगाने तर शोक होतोच ?**

शरीराच्या अनुषंगाने सुद्धा शोक होऊ शकत नाहीं; कारण हे भारता ! सर्व प्राणी जन्माला येण्यापूर्वी अप्रकट होते व मरणानंतर पुन्हा अप्रकट होणार, केवळ जन्माला आल्यानंतर मध्यभागी प्रकट दिसतात म्हणून यात शोक करण्याची गोष्टच कोणती आहे ? ॥ २८ ॥

**तर मग शोक का केला जातो ?**

न जाणल्यामुळे शोक केला जातो.

**जाणता कसे येईल ?**

ते जाणणे अर्थात् अनुभवणे इंद्रियें, मन व बुद्धीकडून होत नाही. म्हणून ह्या शरीरीला पाहणे, बोलणे, ऐकणे हे सर्व आश्चर्यकारकच होत असते म्हणून ह्या शरीरीला ऐकून कोणीही ओळखू शकत नाही. अर्थात् ह्याचा अनुभव स्वकडूनच होतो. ॥ २९ ॥

**तर मग तो कसा आहे ?**

हे भरतवंशी अर्जुना ! सर्वांच्या देहामध्ये वास्तव्य करणारा हा **देही नित्य अवध्य आहे**. अशाप्रकारे जाणून तू कोणत्याही प्राण्याकरिता शोक करू नये. ॥ ३० ॥

**आपण शोक घालविण्याबाबत पुष्कळ गोष्टी सांगितल्या.पण मला जे पापाविषयी भय वाटत आहे, ते कसे घालवावे ?**

स्वतःचा धर्म (क्षात्र धर्म) पाहून ही तू भयभीत होणे योग्य नाही. कारण की, क्षत्रियाकरिता धर्ममय युद्धापेक्षा महान असे दुसरे कोणतेही कल्याणकारी कर्म नाही. ॥ ३१ ॥

**तर मग काय क्षत्रियाने युद्ध करीतच राहिले पाहिजे ?**

नाही, जे युद्ध आपोआप प्राप्त होईल, समोर येईल, ते म्हणजे क्षत्रियाकरिता स्वर्गप्राप्तीचा मोकळा दरवाजाच आहे. म्हणून हे पार्था ! अशाप्रकारे ज्या क्षत्रियाला युद्ध प्राप्त होते, वास्तवतः तेच सुखी आहेत ॥ ३२ ॥

**जर मी अशाप्रकारे आपोआप प्राप्त झालेले युद्ध केले नाही तर ?**

जर तू असे धर्ममय युद्ध करणार नाहीस. तर तुझ्या क्षात्रधर्माचा आणि कीर्तीचा नाश होईल. तसेच तुला कर्तव्यच्यूतीचे पाप लागेल . ॥ ३३ ॥

**अपकीर्तीमुळे काय होईल ?**

अरे भैय्या ! तूं युद्ध केले नाहीस तर सर्व देवता मनुष्य इत्यादी सर्व पुष्कळ दिवस राहणाऱ्या तुझ्या* अपकीर्तीचे कथन करतील ती अपकीर्ती आदरणीय तसेच सन्माननीय मनुष्याकरिता मृत्युपेक्षाही अधिक दुःखकारक होत असते. ॥ ३४ ॥

**भगवान् ! आणखी काय होईल ?**

ज्या भीष्म, द्रोणाचार्य इत्यादी महारथ्यांच्या दृष्टीमध्ये तू श्रेष्ठ मानला गेला आहेस, त्यांच्या दृष्टीमध्ये तू तुच्छतेला प्राप्त होशील आणि ते महारथी तुला मरणाच्या भयामुळे तू युद्धापासून च्युत झाला असे मानतील. ॥ ३५ ॥

---

* भोग प्राप्त होणे हे काही सुख नाही. उलट ते तर मोठ्या दुःखांचे कारण आहे. (५ । २२) वास्तविक सुख तेच आहे की, जे दुःखरहित असेल. स्वधर्मरूप कर्म करण्याची संधी प्राप्त होणे हेच दुःखविरहित सुख आहे. म्हणून ज्यांना कर्तव्य पालनाची संधी प्राप्त झाली आहे तेच वास्तविक सुखी आणि भाग्यशाली आहेत.

केवळ मरणाने अपकीर्ती होत नाही. कारण की, मरण हे प्रत्येकाला येतच असते. पण आपल्या कर्तव्यापासून च्युत होण्यामुळेच अपकीर्ती होत असते.

**काय हे मी सहू शकणार नाही भगवंता ?**

नाही ! तू नाही सहू शकणार; कारण की, जेणेकरून तुझ्या शत्रूंना वैरभाव काढण्याची संधी प्राप्त होईल. ते तुझ्या सामर्थ्याची निंदा करून तुला न बोलण्यासारखी पुष्कळ वचने बोलतील. याच्यापेक्षा मोठे दुःख ते कोणते ? ॥ ३६ ॥

**आणि जर मी युद्ध केले तर ?**

युद्ध करतेवेळी जर तू मारला गेलास तर तुला स्वर्गप्राप्ती होईल आणि युद्धामध्ये जर तू जिंकलेस तर तुला पृथ्वीचे राज्य मिळेल. म्हणून हे कुन्तीनंदना ! तू युद्धाचा निश्चय करून युद्धाकरिता उभा हो. ॥ ३७ ॥

**भगवन् ! पण युद्ध कसे केले पाहिजे ?**

तू जय-पराजय, लाभ-हानी आणि सुख-दुःख यांच्यामध्ये समबुद्धी ठेवून युद्ध कर. याप्रकारे युद्ध केल्याने तुला पाप लागणार नाही. ॥ ३८ ॥

**ज्या समबुद्धीने काम करताना जरासुद्धा पाप लागत नाही तीची अजून काय विशेषता आहे भगवंता ?**

**भगवन् ! समबुद्धी कशी ठेवावी ?**

या समबुद्धीबद्दल मी प्रथम सांख्ययोगात सांगितलेले आहे. आता तू त्याबद्दल कर्मयोगाच्या विषयात ऐक.

१-या समबुद्धीने युक्त असा तूं संपूर्ण कर्माच्या बंधनातून मुक्त होशील.

२-या समबुद्धीच्या सुरुवातीचासुद्धां नाश होत नाही.

३-हिच्या अनुष्ठानाचे कधीही उलटे फल मिळत नाही.

४-हिचे थोडेही अनुष्ठान जन्म-मरणाच्या महान भयापासून रक्षण करते. ॥ ३९-४० ॥

**ज्या समबुद्धीचा आपण एवढा महिमा वर्णन करत आहात, तिच्या प्राप्तीचा उपाय काय आहे ?**

या समबुद्धीच्या प्राप्तीविषयामध्ये व्यवसायात्मिका (एकच परमात्मप्राप्तीबद्दल निश्चयी) बुद्धी एकच असू शकते, परंतु ज्यांचा परमात्मप्राप्तीबद्दल एक निश्चय नसतो. अशा मनुष्यांच्या बुद्ध्या (निश्चय) अनंत आणि बहू भेदयुक्त असतात. ॥ ४१ ॥

**त्यांचा परमात्मप्राप्तीचा एक निश्चय का होत नाही ?**

(१) जे कामनांमध्ये तन्मय होत आहेत (२) स्वर्गालाच श्रेष्ठ मानणारे आहेत (३) वेदांमध्ये सांगितलेल्या सकाम कर्माविषयी आवड धरणारे आहेत तसेच (४) भोगांशिवाय अन्य काहीहि नाहीच असे म्हणणारे आहेत. ते अविवेकी लोक या पुष्पित (दिखाऊ शोभायुक्त) वाणीस बोलतात की, जी जन्मरूप कर्मफल देणारी आहे तसेच भोग आणि ऐश्वर्य प्राप्तीसाठीं पुष्कळशा क्रियांचे वर्णन करणारी आहे. भोगांचे वर्णन करणाऱ्या पुष्पित वाणीने ज्यांचे चित्त हरण केलेले आहे अर्थात् भोगांकडे आकर्षित झालेले आहे आणि जे मानव भोग आणि ऐश्वर्य यांच्यामध्ये अत्यन्त आसक्त आहेत, त्या मानवांची परमात्म्यामध्ये एक निश्चयी बुद्धी होऊ शकत नाहीं. ॥ ४२—४४ ॥

**भगवन् ! भोग आणि ऐश्वर्याच्या आसक्तीपासून वाचण्याकरिता मी काय केले पाहिजे ?**

वेद तीन्ही गुणांच्या कार्याचे (संसाराचे) वर्णन करणारे आहेत म्हणून अर्जुना ! तू वेदांनी सांगितलेल्या सकाम कर्मांपासून रहित हो. राग-द्वेष इत्यादी द्वन्द्वांपासून रहित हो आणि नित्य-निरंतर राहणाऱ्या परमात्मतत्त्वामध्ये स्थित हो. तू अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीची आणि प्राप्त वस्तूच्या रक्षणाचीसुद्धा चिंता करू नकोस आणि केवळ परमात्मपरायण हो अर्थात् फक्त परमात्मप्राप्तीकडेच आपले लक्ष केंद्रित कर. ॥ ४५ ॥

**असा एक निश्चय कोणी करील तर त्याचा काय परिणाम होईल ?**

ज्याप्रमाणे मोठ्या सरोवराची प्राप्ती झाल्यानंतर लहान सरोवराचे काहीही महत्त्व राहत नाही, किंवा काही जरुरीही राहत नाही.त्याचप्रमाणे वेद आणि शास्त्रांचे सार जाणणाऱ्या तत्त्वज्ञ, तसेच जीवन्मुक्त महापुरुषांच्या दृष्टीने संसाराचे तसेच भोगांचे काहीहि महत्त्व राहत नाही. ॥ ४६ ॥

**अशी स्थिती प्राप्त करून घेण्यासाठी माझ्याकरिता काही उपाय आहे का ?**

हो आहे, 'कर्मयोग'. कर्तव्यकर्म करण्यामध्येच तुझा अधिकार आहे त्यापासून मिळणाऱ्या फलामध्ये कधीहि नाही. अर्थात् तू फलाची इच्छा न धरता आपल्या कर्तव्याचे पालन कर. तू कर्मफलाचा हेतुसुद्धा होऊ नकोस अर्थात् ज्या शरीर, इंद्रियें, मन, बुद्धी ईत्यादींनी कर्म केले जाते त्यांच्याविषयी ममतासुद्धा बाळगू नकोस.

**तर मग मी कर्मच कशाकरिता करूं ?**

कर्म न करण्यामध्ये सुद्धा तुझी आसक्ती होता कामा नये. ॥ ४७ ॥

**तर मग कर्म कशाप्रकारे करू ?**

सिद्धी-असिद्धीमध्ये समबुद्धी होण्याला 'योग' म्हणतात, म्हणून धनंजया ! तू आसक्तीचा त्याग करून योगामध्ये (समतेमध्ये) स्थित होऊन कर्म कर. ॥ ४८ ॥

**जर योगामध्ये (समतेमध्ये) स्थित होऊन कर्म न केले तर ?**

या समतेशिवाय सकाम कर्म फारच अत्यन्त निकृष्ट आहे. म्हणून धनंजया ! तू समबुद्धीचाच आश्रय घे. कारण की, कर्मफलाची इच्छा करणारे कृपण आहेत, अर्थात् कर्मफलाचे गुलाम आहेत. ॥ ४९ ॥

**कर्मफलाची इच्छा करणारे कृपण आहेत तर मग श्रेष्ठ कोण आहेत ?**

ज्याची बुद्धी सम आहे तो मनुष्य श्रेष्ठ आहे.समबुद्धीने युक्त असणाऱ्या मनुष्य ह्या जन्मांतच पापपुण्यापासून रहित होतो. म्हणून

तू समतेमध्येच स्थित हो, कारण की, कर्मामध्ये समताच कुशलता आहे. ॥ ५० ॥

**भगवन्! कर्मामध्ये समता ठेवण्याने काय होईल ?**

समतायुक्त मनुष्य कर्मजन्य फलाचा त्याग करून आणि जन्म-बंधनापासून मुक्त होऊन निर्विकार अशा पदाला प्राप्त होतो. ॥ ५१ ॥

**मी कर्मजन्य फलाचा त्याग केलेला आहे हे केव्हा समजावे ?**

जेव्हा तुझी बुद्धी मोहरूपी मलातून तरून जाईल, तेव्हा तुला ऐकलेल्या व पुढे ऐकू येणाऱ्या (भुक्त आणि अभुक्त) भोगांविषयी वैराग्य प्राप्त होईल. ॥ ५२ ॥

**वैराग्य प्राप्त झाल्यावर पुन्हा समतेची प्राप्ती केव्हा होईल ?**

शास्त्रांच्या अनेक सिद्धांतापासून, मतभेदापासून विचलित झालेली तुझी बुद्धी जेव्हा संसारापासून पूर्णपणे विन्मुख होऊन परमात्म्यामध्ये स्थिर होईल, तेव्हा तुला योगाची (साध्यरूप समतेची) प्राप्ती होईल. ॥ ५३ ॥

**अर्जुन म्हणाला—समता प्राप्त झालेल्या स्थिर बुद्धीच्या मनुष्याची लक्षणे कोणती असतात ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—पार्था ! जेव्हा साधक मनात असणाऱ्या सर्व कामनांचा त्याग करतो आणि स्वतः, स्वतःमध्येच सन्तुष्ट राहत असतो, तेव्हा त्याला स्थितप्रज्ञ (स्थिर बुद्धीचा) म्हटला जाते. ॥ ५४-५५ ॥

**त्या स्थितप्रज्ञाचे बोलणे कशाप्रकारचे असते ?**

त्याचे बोलणे साधारण क्रियारूपाचे नसते, तर भावरूपाचे असते. वर्तमान व्यवहार करतेवेळी दुःखाची प्राप्ती झाल्यानंतर ज्याच्या मनात उद्वेग उत्पन्न होत नाही आणि सुखाची प्राप्ती झाल्यानंतर ज्याच्या मनात इच्छा उत्पन्न होत नाही तसेच जो आसक्ती, भय आणि क्रोधरहित झालेला असतो, त्या मननशील मनुष्याला स्थितप्रज्ञ म्हटले जाते. सर्व ठिकाणी आसक्तिरहित झालेला मनुष्य प्रारब्धवश प्राप्त होणाऱ्या अनुकूल

परिस्थितीमध्ये आनंदित होत नाही आणि प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाल्यावर द्वेष करीत नाही, त्याची बुद्धी स्थिर झालेली असते. अर्थात् प्रथम त्याने मला परमात्म्याचीच प्राप्ती करायची आहे असा निश्चय केला होता. तो आता सिद्धीस गेला आहे. ॥ ५६-५७ ॥

**भगवन् ! तो स्थितप्रज्ञ कशाप्रकारे बसतो ?**

ज्याप्रमाणे कासव आपले चार पाय, मान आणि शेपूट ह्या सहाही अंगाचे आकुंचन करून (आवरून) बसतो. अशाप्रकारे ज्यावेळी तो कर्मयोगी सर्व इंद्रियें आणि मनाला आपापल्या विषयांपासून दूर करतो त्यावेळी त्याची बुद्धी स्थिर होत असते. ॥ ५८ ॥

**इंद्रियांना परावृत्त केल्याची वास्तविक ओळख काय आहे ?**

इन्द्रियांना त्यांच्या विषयांपासून दूर करणाऱ्या मनुष्याचे सुद्धा विषय तर निवृत्त होत असतात परंतु रसबुद्धी (सुखभोगबुद्धी) निवृत्त होत नाही. परंतु परमात्मप्राप्ती झाल्यामुळे ह्या स्थितप्रज्ञ मनुष्याची रसबुद्धीसुद्धा निवृत्त होत असते. ॥ ५९ ॥

**रसबुद्धी राहिल्यामुळे कोणते नुकसान होत असते ?**

कुन्तीनन्दन ! रसबुद्धी राहिल्यामुळे साधनपरायण विवेकी मनुष्याचीसुद्धा दांडगी इंद्रिये, त्याच्या मनाला बळजबरीने विषयांकडे ओढत असतात ॥ ६० ॥

**भगवन् ! ह्या रसबुद्धीला घालविण्याकरिता काय केले पाहिजे ?**

कर्मयोगी साधक संपूर्ण इंद्रियांना वश करून मत्परायण होईल अर्थात् माझ्यावर विश्वास ठेवून जो चिंताविरहित होईल. अशाप्रकारे ज्याची इंद्रिये ताब्यात आहेत त्याची बुद्धी प्रतिष्ठित आहे. ॥ ६१ ॥

**परमात्मपरायण न होण्यामुळे काय होईल ?**

परमात्मपरायण न होण्यामुळे विषयांचे (भोगांचे) चिंतन होईल.

**विषयांच्या चिंतनामुळे काय होईल ?**

मनुष्याची त्या विषयांमध्ये आसक्ती उत्पन्न होईल.

**आसक्ती होण्यामुळे काय होईल ?**

त्या विषयांना (भोगांना) प्राप्त करण्याची इच्छा उत्पन्न होईल.

**इच्छा उत्पन्न झाल्यामुळे काय होईल ?**

इच्छापूर्तीमध्ये अडथळा आल्यास क्रोध येईल. ॥ ६२ ॥

**क्रोध आल्याने काय होईल ?**

क्रोध आल्याने विवेकबुद्धी नष्ट होईल अर्थात् मूर्खता प्राप्त होईल.

**मूर्खता प्राप्त होण्यामुळे काय होईल ?**

मी साधक आहे तेव्हा मला योग्य व्यवहार केला पाहिजे, योग्य तेच बोलले पाहिजे' अशाप्रकारचा जो प्रथम विचार केलेला होता त्याची स्मृती नष्ट होऊन जाईल अर्थात् त्याची आठवण राहणार नाही.

**स्मृती नष्ट झाल्यामुळे काय होईल ?**

बुद्धी (नवीन विचारशक्ती) नष्ट होईल. अर्थात् अशावेळी मला काय केले पाहिजे आणि काय नाही, ही विवेकशक्ती दबली जाईल.

**बुद्धी नष्ट झाल्यामुळे काय होईल ?**

त्या मनुष्याचे पतन होईल. ॥ ६३ ॥

**स्थितप्रज्ञ मनुष्याच्या बसण्याची गोष्ट तर आपण सांगितली. आता हे सांगा की ? तो चालतो कसा ?**

भैय्या ! त्याचे चालणे क्रियारूप नसते, भावरूप असते. ज्याचे अन्तःकरण वश झालेले असते असा साधक रागद्वेषापासून रहित असतो वश केलेल्या आपल्या इंद्रियांकडून विषयांचे सेवन करीत असता अंतःकरणाच्या प्रसन्नतेस प्राप्त होत असतो ॥ ६४ ॥

**अन्तःकरण्याच्या प्रसन्नतेस प्राप्त झाल्यानंतर काय होते ?**

त्या प्रसन्नचित्त मनुष्याच्या संपूर्ण दुःखांचा नाश होत असतो आणि त्याची बुद्धी लवकरच परमात्म्यामध्ये स्थिर होते. ॥ ६५ ॥

**बुद्धी स्थिर कोणाची होत नाही ?**

ज्याचा मन आणि इंद्रियांवर संयम नाही अशा मनुष्याची बुद्धी व्यवसायात्मिका (एकनिश्चयी) होत नाही, बुद्धी व्यवसायात्मिका नसल्यामुळे त्याची ''मला केवळ आपल्या कर्तव्याचे पालन करणे आहे'' अशाप्रकारची भावना होत नाही. अर्थात् आपल्या कर्तव्याचे पालन न होण्यामुळे त्याला शांती मिळत नाही. मग अशांत मनुष्याला सुखसुद्धा कसे मिळू शकणार ? ॥ ६६ ॥

**जो संसारी (भोगी) आहे. त्याची बुद्धी स्थिर होण्याची शक्यताच नाही. पण जो साधक आहे, त्याची बुद्धी स्थिर न होण्यात काय कारण आहे ?**

कारण हे आहे की, ज्याप्रमाणे पाण्यामध्ये चालणारी नाव वाऱ्याकडून अमार्गाला नेली जाते. त्याचप्रमाणे साधकाच्या आपापल्या विषयांमध्ये विचरण करणाऱ्या इंद्रियांपैकी एक इंद्रिय जरी मनाबरोबर असले तरी त्या इंद्रियांबरोबर मिळालेले ते एकटे मन त्या साधकाची बुद्धी हरण करूण घेत असते. ॥ ६७ ॥

**तर मग बुद्धी स्थिर कोणाची होत असते ?**

हे महाबाहो ! ज्याची इंद्रियें सर्व प्रकारे वशीभूत झालेली असतात अर्थात् ज्याच्या मनानेसुद्धा विषयांचे चिंतन होत नाही त्याची बुद्धी स्थिर होत असते. ॥ ६८ ॥

**ज्याची इंद्रिये ताब्यात नाहीत, अशा साधारण मनुष्यात आणि ज्याची इंद्रिये ताब्यात आहेत. अशा संयमी मनुष्यात काय अंतर असते ?**

साधारण मनुष्याची जी रात्र आहे अर्थात् जो परमात्मप्राप्तीच्या विषयात बिल्कुल झोपलेला असतो. त्या रात्रीमध्ये संयमी मनुष्य जागृत असतो अर्थात् परमात्मतत्त्वाचा अनुभव घेत असतो आणि ज्यामध्ये

साधारण मनुष्य जागत असतात अर्थात् भोग भोगण्यात व संग्रह करण्यामध्ये मोठे सावध व तत्पर असतात ती तर परमात्मतत्त्वाला जाणणाऱ्या मननशील मनुष्याच्या दृष्टीने रात्र आहे. अंधार आहे. ॥ ६९ ॥

**तर मग त्या संयमी मनुष्याच्या समोर भोग-पदार्थ येतच नसणार ?**

येतात. ज्याप्रमाणे आपल्या मर्यादेमध्ये अटळ राहणाऱ्या आणि चारी बाजूंनी पाण्याने परिपूर्ण असणाऱ्या समुद्रात सर्व नद्यांचे पाणी येऊन मिळत असते परंतु ते समुद्रामध्ये कोणताही विकार उत्पन्न करीत नाही. त्याचप्रमाणे त्या संयमी मनुष्याच्या समोर जगातील सर्व भोग येत असतात पण ते भोग त्याच्यामध्ये कोणतेही विकार उत्पन्न करीत नाहीत. असा मनुष्यच परमशांतीला (परमात्मतत्त्वाला) प्राप्त होत असतो भोगांची इच्छा धरणारा नाही. ॥ ७० ॥

**भोगांची इच्छा धरणाराला सुद्धा शान्तीची प्राप्ती कशी होईल ?**

त्यांना तर त्यागापासूनच शान्ती प्राप्त होईल. जो मनुष्य सर्व कामनांचा त्याचप्रमाणे स्पृहेचा त्याग करून अहंता-ममतेपासून रहित होऊन वागत असतो, त्याला शांती प्राप्त होत असते ॥ ७१ ॥

**अहंता ममतारहित झाल्यावर त्याची स्थिती कोठे होत असते ?**

त्याची स्थिती ब्रह्मात होत असते. हे पार्था ! हीच ब्राह्मी स्थिती आहे, ही स्थिती प्राप्त झाल्यांनतर मनुष्य कधीहि मोहित होत नाही. जरी मनुष्य या ब्राह्मी स्थितीमध्ये आयुष्याच्या शेवटच्या क्षणीही स्थित झाला अर्थात् अन्तकाळीसुद्धा अहंता-ममतारहित झाला तरी तो निर्वाण (शान्त) ब्रम्हाला प्राप्त होत असतो. ॥ ७२ ॥

══ ★ ══

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय तिसरा

**अर्जुन म्हणाला, हे जनार्दना ! आपल्या मतें जर ज्ञानबुद्धी श्रेष्ठ आहे तर हे केशवा ! तुम्ही मला हे घोर कर्म करण्यास का प्रवृत्त करता ?**

तसेच आपण कधी सांगता कर्म कर आणि कधी सांगता ज्ञानाचा आश्रय घे. आपल्या ह्या संमिश्र वचनांनी जणू काय माझी बुद्धी मोहित होत आहे. याकरिता एक निश्चित गोष्ट मला सांगा की, ज्यायोगे मी परम कल्याणास प्राप्त होईन. ॥ १-२ ॥

श्रीभगवान म्हणालेः—हे निष्पाप अर्जुना ! या मनुष्यलोकामध्ये दोन प्रकारची निष्ठा माझ्याकडून पूर्वी सांगितली गेली आहे. त्यामध्ये सांख्ययोग्यांची निष्ठा ज्ञानयोगाने व कर्मयोग्यांची निष्ठा कर्मयोगाने सांगितली आहे. अर्थात् ज्ञानयोगाने व कर्मयोगाने एकाच समबुद्धीची प्राप्ती होत असते. ॥ ३ ॥

**त्या समतेच्या प्राप्तीकरिता कर्म करणे जरूरीचे आहे का ?**

हो, जरूरीचे आहे. कारण की, मनुष्य विहित कर्माचा आरंभ केल्याशिवाय नैष्कर्मतेला प्राप्त होत नाही तसेच कर्मांच्या त्यागाने सिद्धीलाही प्राप्त होत नाही. तात्पर्य हे आहे की, समतेची प्राप्ती कर्माचा आरंभ केल्याशिवायही प्राप्त होत नाही आणि कर्मांच्या त्यागाने सुद्धा होत नाही. ॥ ४ ॥

**कर्मांच्या त्यागाने समतेची प्राप्ति का होत नाही ?**

कोणताही मनुष्य कोणत्याही अवस्थेत एक क्षणभरसुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. कारण की, प्रकृतीपासून झालेले सत्त्व-

रज-तम हे गुण त्या प्राण्यांकडून स्वभावशात कर्म करून घेत असतात. तर मग प्राणी कर्मांचा त्याग कसा करू शकेल ? ॥ ५ ॥

**जर मनुष्य गपचूप बसून राहिला, त्याने काहीही केले नाही तर मग हा कर्मांचा त्याग झाला नाही का ?**

नाही. जो मनुष्य गपचूप बसून म्हणजे वरवर इंद्रियांचे संयमन करून मनाने विषयांचे चिंतन करत राहतो, त्याचे हे गप्प बसणे कर्माचा त्याग करणे झाले नाही तर उलट ते ह्या मूढबुद्धी पुरुषाचे गप्प बसणे (कर्मेन्द्रियांचे संयमन करणे) ढोंगीपणाचे आहे. ॥ ६ ॥

**आपण जी समबुद्धी सांगितली, तिची प्राप्ती कर्म केल्याशिवायही होत नाही, कर्माच्या त्यागानेही होत नाही आणि बाहेरून कर्मेन्द्रियांचे संयमन करून मनाने विषयांचे चिंतन करत राहण्यानेही होत नाही तर मग त्या समबुद्धीची प्राप्ती कशाप्रकारे होते ?**

हे अर्जुना ! जो मनुष्य मनाने इन्द्रियांचे नियमन करून आसक्तिरहित होऊन इंन्द्रियांद्वारा कर्मयोगाचे (निष्कामभावपूर्वक कर्तव्यकर्मांचे) आचरण करत असतो, तो श्रेष्ठ आहे अर्थात् त्याला समबुद्धीची प्राप्ती होते. म्हणून तू शास्त्रविधीने नियत केलेले कर्तव्यकर्म कर. कारण की, कर्म न करण्यापेक्षा शास्त्रविधीने निष्कामभावयुक्त कर्तव्यकर्म करणे श्रेष्ठ आहे आणि कर्म केल्याशिवाय तुझ्या शरिराचा निर्वाहसुद्धा होणार नाही. ॥ ७-८ ॥

**भगवन् ! कर्म करण्यामुळे बन्धन तर होणार नाही ?**

नाही. यज्ञ म्हणजे कर्तव्यकर्म. हे केवळ स्वतःकरितां केल्यामुळेच मनुष्य कर्मांनी बांधला जातो. म्हणून हे कुन्तीनन्दना ! तू आसक्ती सोडून यज्ञकर-कर्तव्यकर्म हे केवळ कर्तव्य परम्परा सुरक्षित ठेवण्यासाठीच कर. ॥ ९ ॥

**मी कर्म करूच का ?**

सृष्टीच्या आरंभीही पितामह ब्रह्मदेवांनीसुद्धा यज्ञासह (कर्तव्य-कर्मांच्यासह) मनुष्याची निर्मिती करून त्यांना हेच सांगितले होते की, तुम्ही ह्या कर्तव्यकर्मरूप यज्ञाद्वारा वृद्धीला प्राप्त व्हा. हा यज्ञ तुम्हाला कर्तव्य पालनाची आवश्यक सामग्री प्रदान करणारा होवो. ॥ १० ॥

या यज्ञाद्वारा तुम्ही देवतांची वृद्धी (उन्नती) करा आणि ते देवता तुमची वृद्धी करोत. अशाप्रकारे एकमेकांची वृद्धी करण्याने म्हणजेच स्वतःकरिता कर्म न करता केवळ परहिताकरिता सर्व कर्म करण्याने तुम्ही परमश्रेयास (परमात्म्यास) प्राप्त व्हाल. ॥ ११ ॥

**पितामह ! जर आम्ही यज्ञ केला नाही तर ?**

तुमच्या कर्मव्यकर्मरूप यज्ञाद्वारा वृद्धी पावलेले देवतालोक तुम्हाला न मागतासुद्धा कर्तव्य पालणाची आवश्यक सामग्री देत राहतील. परंतु जर तुम्ही त्या कर्तव्य पालनाच्या सामग्रीने देवतांची पुष्टी (वृद्धी) न करता, स्वतःच सुख-आराम (भोगत) रहाल तर तुम्ही चोर बनाल. ॥ १२ ॥

**भगवन् ! या दोषापासून कसे वाचता येईल ?**

भैय्या ! केवळ दुसऱ्यांच्या हिताकरिताच कर्तव्यकर्म करण्याने, देवयज्ञादी करून शिल्लक राहिलेल्या रूपाने समतेचा अनुभव येत असतो. त्या समतेचा अनुभव करणारे श्रेष्ठ पुरूष संपूर्ण पापापासून मुक्त होत असतात, परंतु जे केवळ स्वतःच्या सुखाकरिताच सर्व कर्म करीत असतात, ते पापी लोक तर केवल पापाचीच कमाई करत असतात. ॥ १३ ॥

**भगवन ! आता आपण कर्तव्यकर्माबाबत ब्रह्मदेवांची आज्ञा ऐकविली पण कर्तव्यकर्म विषयामध्ये आपले काय म्हणणे आहे ?**

याविषयी माझे हेच म्हणणे आहे की, सृष्टि-चक्राच्या संचालनाकरिता-सुद्धा कर्तव्यकर्म करण्याची आवश्यकता आहे. कारण की, सर्व प्राण्यांची उत्पत्ती अन्नापासून होत असते आणि अन्नाची उत्पत्ती पर्जन्यापासून होत असते. पर्जन्य यज्ञापासून (कर्तव्यपालनापासून) आणि यज्ञ निष्कामभावाने

केलेल्या कर्मापासून होत असतो. कर्तव्यकर्म करण्याचा विधि वेद सांगतात आणि वेद परमात्म्यापासून प्रकट होतात. म्हणून सर्वव्यापी परमात्मा यज्ञामध्ये (कर्तव्यकर्मामध्ये) सतत विद्यमान राहतात, अर्थात् परमात्म्याची प्राप्ती आपले कर्तव्य पालन करण्याने होत असते. म्हणून सृष्टिचक्राच्या रक्षणाकरिता स्वकर्तव्याचे पालन करणे मानवाकरिता फार जरुरीचे आहे. ॥ १४-१५ ॥

**जर कोणी ह्या सृष्टिचक्राच्या सुरक्षेकरिता स्वकर्तव्याचे पालन केले नाही तर ?**

पार्थ ! जो मनुष्य ह्या सृष्टिचक्राच्या परंपरेला सुरक्षित ठेवण्याकरिता कर्तव्यकर्म करत नाही . तो इंन्द्रियांद्वारा विषय भोगणारा तसेच पापमय आयुष्य घालवणारा मनुष्य ह्या जगतामध्ये व्यर्थ जगत असतो अर्थात् तो मेला तर चांगलेच आहे. ॥ १६ ॥

**कोणी आसक्तिरहित होऊन केवळ आपल्या आज्ञेनुसार सृष्टि-चक्राची परंपरा सुरक्षित ठेवण्याकरिताच कर्तव्यकर्माचे पालन करील तर?**

तो स्वतः स्वतःमध्येच रमणारा, स्वतःमध्येच तृप्त आणि स्वतः-मध्येच सन्तुष्ट होत असतो. मग त्याच्याकरिता काहीहि करणे शिल्लक राहत नाही. कारण कि, त्या महापुरुषाचे या लोकात कर्म करण्यात काही प्रयोजन राहत नाही किंवा कर्म न करण्यामध्ये सुद्धा काही प्रयोजन राहत नाही. ॥ १७-१८ ॥

**भगवन् ! मीसुद्धा असा होऊ शकतो काय ?**

हो, होऊ शकतो. तू सतत आसक्तिरहित होऊन आपल्या कर्तव्याचे चांगल्याप्रकारे पालन कर. कारण की आसक्तिरहित होऊन कर्तव्यकर्म केल्यामुळे मानवाला परमात्म्याची प्राप्ती होत असते. ॥ १९ ॥

**आसक्तिरहित होऊन या अगोदर कोणी कर्म केलेले आहे आणि**

**त्याना परमात्म्याची प्राप्तीसुद्धा झालेली आहे काय ?**

हो! राजा जनकाप्रमाणे अनेक महापुरुष कर्मानुष्ठान करूनच परमात्मपदाला पोहचलेले आहेत. परमात्म्याची प्राप्ती झाल्यानंतरसुद्धा त्यांनी लोकसंग्रहाकरिता (जगताला कुमार्गापासून वाचवून सन्मार्गावर आणण्याकरिता) कर्म केलेले आहे. म्हणून तू सुद्धा लोकसंग्रह लक्षात ठेवून आपल्या कर्तव्यकर्माचे पालन करीत रहा. ॥ २० ॥

**तो लोकसंग्रह कसा असतो ?**

तो लोकसंग्रह दोन प्रकारानें होत असतो (१) आपल्या कर्तव्य-परायणतेकडून आणि (२) आपल्या वाणीकडून होत असतो. श्रेष्ठ मनुष्य जे-जे आचरण करीत असतो ते-तेच दुसरा मनुष्यही आचरण करीत असतो. तो आपल्या वाणीने जे काही प्रमाणित करत असतो दुसरे लोकसुद्धा त्याचे अनुकरण करत असतात. ॥ २१ ॥

**ज्याप्रमाणे आपण परमात्मप्राप्तीच्या विषयात जनकादिकांचे उदाहरण दिले. त्याचप्रमाणे लोकसंग्रहाबाबत सुद्धा काही उदाहरण आहे का ?**

हो ! आहे, हे पार्था ! माझेच उदाहरण घे. या तीनही लोकांमध्ये माझ्याकरिता काहीहि कर्तव्य शिल्लक नाही आणि प्राप्त करण्यायोग्य अप्राप्त अशी कोणतीही वस्तु नाही. तरीसुद्धा मी लोक-संग्रहाकरिता कर्तव्यकर्म करत असतो. ॥ २२ ॥

**भगवन् ! आपणाकरिता कर्तव्यकर्म करण्याची काय जरूरी आहे ?**

हो. पार्था ! जरूरी आहे. कारण की, जर मी आळस सोडून कर्तव्य- कर्म केले नाही तर मानव सर्व प्रकारे माझ्याच मार्गाचे अनुसरण करतील. म्हणजेच तेसुद्धा कर्तव्यकर्म सोडून देतील. ॥ २३ ॥

**भगवन् ! त्यामुळे काय होईल !**

जर मी कर्तव्यकर्म केले नाही, तर आप-आपले कर्तव्यकर्म न केल्यामुळे सर्व मानव नष्ट-भ्रष्ट होऊन जातील आणि मी सर्वप्रकारे वर्णसंकर दोषाला निर्माण करणारा तसेच सर्व प्रजेला नष्ट करणारा होईन. ॥ २४ ॥

**यादृष्टीने लोकसंग्रहाकरिता आपण कर्तव्यकर्म करणे तर फारच जरूरीचे आहे. पण तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांकरितासुद्धा कर्तव्यकर्म करणे जरूरीचे आहे काय ?**

होय ! अर्जुना ! केवळ जरूरीचे नाही तर फारच जरूरीचे आहे. ज्याप्रमाणे अज्ञानी मनुष्य कर्मामध्ये आसक्त होऊन फलेच्छा धरून तत्परतापूर्वक कर्म करत असतो.त्याचप्रमाणे आसक्तिरहित ज्ञानी पुरुषानेसुद्धा लोकसंग्रहाकरिता तत्परतापूर्वक कर्म केले पाहिजे. त्याने कर्मामध्ये आसक्त असलेल्या त्या अज्ञानी पुरुषांच्या बुद्धीमध्ये कोणत्याही प्रकारचा भ्रम उत्पन्न न करता स्वतःसुद्धा मोठ्या सावधानतेने कर्म करावे तसेच त्यांच्याकडूनसुद्धा त्याचप्रमाणे कर्म करवून घ्यावे अशाप्रकारे ज्ञानी महापुरुषाने वागले पाहिजे. ॥ २५-२६ ॥

**अज्ञानी आणि ज्ञानी या दोघांच्या कर्तव्य करण्यामध्ये कोणता फरक असतो ?**

सम्पूर्ण कर्म सर्व प्रकारे प्रकृतीच्या गुणांद्वारे केले जात असते. परंतु ज्याचे अंतःकरण अहंकाराने मोहित झालेले आहे असा अज्ञानीपुरूष' मी कर्ता आहे असे मानत असतो आणि हे महाबाहो ! गुण विभाग व कर्म विभाग *यांच्या तत्त्वाला जाणणारा ज्ञानी महापुरुष' संपूर्ण गुणच गुणांमध्ये

* सत्व, रज आणि तम या तीन्ही गुणांचे कार्य असल्यामुळे शरीर, इन्द्रिये, मन, बुद्धी, प्राणी, पदार्थ इत्यादी सर्व संसार हा 'गुणविभाग' आहे आणि त्यामध्यें होणाऱ्या सर्व क्रिया 'कर्मविभाग' आहे.

प्रवृत्त होत असतात अर्थात् संपूर्ण क्रिया प्रकृतीमध्येच होत असतात' अशाप्रकारचा अनुभव करून त्यामध्ये आसक्त होत नाही. ॥ २७-२८ ॥

**जेवढी जबाबदारी आपणावर आहे तेवढीच जबाबदारी ज्ञानी महापुरूषावर सुद्धा असते कां ?**

नाही, ज्ञानी पुरुषाने अज्ञानी पुरुषांप्रमाणे कर्म नाही केले तरी काही हरकत नाही. पण त्याने कोणत्याही प्रकारे कमीतकमी प्रकृतिजन्य गुणांनी मोहित आणि गुण तसेच कर्मांमध्ये आसक्त झालेल्या अज्ञानी पुरुषांचा बुद्धिभेद करू नये, त्यांना विचलित करू नये. ॥ २९ ॥

**पण भगवन् ! मी तर विचलित होतो आहे. काय करू ?**

तू विवेकयुक्त बुद्धीद्वारा सर्व कर्मे मला अर्पण करून कामना, ममता आणि सन्तापविरहित होऊन युद्ध (कर्तव्यकर्म) कर. ॥ ३० ॥

**सम्पूर्ण कर्तव्यकर्मांना आपणास अर्पण करण्याने काय होईल ?**

जे लोक दोषदृष्टिरहित होऊन श्रद्धापूर्वक सतत माझ्या या मतानुसार चालत असतात ते सम्पूर्ण कर्मांच्या बंधनातून मुक्त होतात. ॥ ३१ ॥

**परंतु जे आपल्या मतानुसार वागत नसतात त्यांचे काय होत असते ?**

जे माझ्या या मतांमध्ये दोषदृष्टी ठेवून त्यानुसार आचरण करीत नाहीत, त्या सांसारिक ज्ञानाने मोहित आणि पारमार्थिक ज्ञानविरहीत अविवेकी मानवांना तू नष्ट झालेलेच समज. ॥ ३२ ॥

**आपल्या मतानुसार न चालणारांचा नाश (पतन) का होतो ?**

ज्ञानी पुरुष तर स्वतःच्या रागद्वेषरहित शुद्ध स्वभावानुसार क्रिया करीत असतात, परंतु हे मानव स्वतःच्या रागद्वेषयुक्त दूषित स्वभावानुसार कर्म करतात म्हणून शास्त्रमर्यादेनुसार कर्म करण्यात यांचा स्वभाव वश होत नाही, त्याबाबत त्यांची बळजबरी चालत नाही. अशाप्रकारे स्वतः दूषित स्वभावाधीन झाल्यामुळे त्यांचे पतन होत असते ॥ ३३ ॥

**भगवन्! या पतनापासून वाचण्याचा काय उपाय आहे ?**

प्रत्येक इन्द्रियात आणि इन्द्रियाच्या विषयात रागद्वेष गुप्तरूपाने स्थित आहेत म्हणून मनुष्याने रागद्वेष या विकारांच्या ताब्यात जाऊन कर्म करू नये. कारण की, राग-द्वेष हे दोन्हीही मानवाचे शत्रु आहेत. ॥ ३४ ॥

**तर मग मनुष्याने काय केले पाहिजे ?**

आपल्या धर्माचे (कर्तव्याचे) पालन केले पाहिजे. गुणांनी कमी असला तरी परधर्माहून स्वधर्म श्रेष्ठ आहे. स्वधर्माचे पालन करीत असता जरी मरण आले, तरी ते स्वधर्मपालन कल्याण करणारेच आहे. परंतु दुसऱ्यांचा धर्म कितीही गुणयुक्त असूनसुद्धा नरकादी भय देणारा आहे. ॥ ३५ ॥

**अर्जुन म्हणाला—जर धर्म पालन करणेच श्रेष्ठ आहे. तर मग मनुष्याची इच्छा नसतानासुद्धा तो कोणाच्या प्रेरणेने अधर्माचे, पापाचे आचरण करीत असतो ? ॥ ३६ ॥**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—रजोगुणापासून उत्पन्न होणाऱ्या कामासच (कामनेस) तू पाप करवून घेणारा समज. या कामापासूनच क्रोधाची उत्पत्ती होत असते. हा काम कधीही तृप्त न होणारा तसेच महापापी आहे. ॥ ३७ ॥

**हा महापापी काम काय करत असतो ?**

ज्याप्रमाणे धूराने अग्नी आच्छादिला जातो, मळाने आरसा आच्छादिला जातो आणि जाराने गर्भ आच्छादिला जातो. त्याचप्रमाणे हा काम पाप न करण्याच्या इच्छेला दाबून मनुष्याला पाप करण्यास प्रवृत्त करतो आणि हे कुन्तीनन्दना ! हा काम अग्नीप्रमाणे कधीहि तृप्त न होणारा आणि विवेकी साधकांचा कायमचा शत्रू आहे. या कामाकडून मनुष्याचा विवेक झांकला जातो. ॥ ३८-३९ ॥

**अशाप्रकारचा तो काम राहतो कोठे ?**

तो काम इंद्रियें, मन आणि बुद्धि या तीन्ही ठिकाणी राहत असतो. आणि त्यांच्याद्वारा देहाभिमानी मनुष्याच्या ज्ञानाला आच्छादित करून त्याला मोहित करीत असतो. ॥ ४० ॥

**त्या कामाचा नाश कशाप्रकारे केला जाईल?**

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! तू सर्वप्रथम इंद्रियांना ताब्यात ठेवून या ज्ञान आणि विज्ञानाला आच्छादित करणाऱ्या महापापी कामाला जरूर मारून टाक ॥ ४१ ॥

**भगवन् ! आपण जो उपाय सांगितला. त्याला आचरणात कशाप्रकारे आणू ?**

शरीरापेक्षा इंद्रिये श्रेष्ठ (सबल, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म) आहेत, इंद्रियांपेक्षा मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षा बुद्धी श्रेष्ठ आहे आणि बुद्धीपेक्षा काम श्रेष्ठ आहे.* अशाप्रकारे कामास बुद्धीपेक्षा श्रेष्ठ जाणून स्वतःकडून स्वतःला ताब्यात ठेवून हे महाबाहो अर्जुना ! तू या अजिंक्य अशा कामरूपी शत्रूस मारून टाक ॥ ४२-४३ ॥



---

* काम 'अहम्' (कर्ता) मध्ये राहत असतो. म्हणून कर्त्याची पदार्थादिकांकडे ओढ असते. 'अहं' मध्ये एक तर प्रकृतीचा अंश (जड अंश) असतो आणि एक परमात्म्याचा अंश (चेतनअंश) असतो. प्रकृतीचा अंश स्वाभाविकपणे प्रकृतीकडे आणि परमात्म्याचा अंश स्वाभाविकपणेच (सजातीय असल्यामुळें) परमात्म्याकडे खेचतो म्हणून 'अहम्' च्या जड अंशामध्ये काम राहत असतो आणि चेतन अंशामध्ये तत्त्वजिज्ञासा, प्रेम-इच्छा इत्यादी राहतात.

# अध्याय चौथा

**आतां आपण ज्या कर्मयोगामध्ये कामाच्या (कामनेच्या) नाशाकरिता प्रेरणा केलेली आहे. त्या कर्मयोगाची परंपरा काय आहे ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले :—हा अविनाशी योग मी सर्वप्रथम सूर्यास सांगितला होता. नंतर सूर्याने (आपला पुत्र) मनूला आणि मनूनें (आपला पुत्र) इक्ष्वाकूला सांगितला. अशाप्रकारे अर्जुना! परंपरेने चालत आलेल्या या अविनाशी योगास राजर्षि लोकांनी जाणून घेतले. परन्तु पुष्कळ काळ निघून गेल्यामुळे तो योग या मानवलोकात लुप्तप्राय झालेला आहे. तू माझा भक्त आणि प्रिय सखा आहेस. म्हणून तोच हा पुरातन योग आज मी तुला सांगितला आहे. जी एक मोठी उत्तम रहस्यपूर्ण गोष्ट आहे. ॥ १—३ ॥

**अर्जुन म्हणाला—परंतु भगवन्! ज्या सूर्याला आपण उपदेश दिला होता, तो सूर्य तर फार पूर्वी उत्पन्न झालेला आहे आणि आपला जन्म (अवतार) तर आता झालेला आहे. म्हणून मी हे कसे समजू की, सृष्टीच्या आरंभी आपणच सूर्याला उपदेश दिला होता ?॥ ४ ॥**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—हे परंतप अर्जुना ! ही गोष्ट माझ्या या जन्मातील (अवतारातील) नाही. याअगोदर माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेलेले आहेत त्या सर्व जन्मांना मी जाणतो अर्थात् कोणकोणत्या जन्मात मी आणि तू काय केले त्या सर्व गोष्टी मी जाणतो आहे. परंतु तू स्वतःच्या जन्मांना आणि कृतकर्मांनासुद्धा आठवत नाहीस. ॥ ५ ॥

**जसा माझा जन्म झालेला आहे तसाच आपला जन्म नाही झाला काय ?**

नाही मी अजन्मा अविनाशी तसेच सर्व प्राणिमात्रांचा ईश्वर असून-सुद्धा आपल्या त्रिगुणात्मक प्रकृतीला वश करून आपल्या योगमायेने प्रगट होत असतो. ॥ ६ ॥

**आपली प्रगट होण्याची वेळ कोणती आहे ?**

भरतवंशी अर्जुना ! जेव्हा-जेव्हा धर्माची हानी आणि अधर्माची वाढ होत असते, तेव्हा-तेव्हा मी अवतार घेत असतो. ॥ ७ ॥

**आपले अवतार घेण्याचे प्रयोजन काय आहे ?**

साधूंचे (भक्तांचे) रक्षण, दुष्टांचा विनाश आणि धर्माची उत्तम प्रकारे स्थापना करण्याकरिता मी प्रत्येक युगात अवतार घेत असतो. ॥ ८ ॥

**अशाप्रकारे पुन्हा पुन्हा जन्म (अवतार) घेण्यामुळे आपण बद्ध होत नाहीत का ?**

नाही, अर्जुना ! माझे जन्म व कर्म अलौकिक आहे. आपला काहीही स्वार्थ न ठेवता केवळ जगताचे हित करण्याकरिताच मी प्रगट होत असतो. ह्या गोष्टीला जो मनुष्य अगदी बरोबर ओळखतो तो देहाला टाकल्यानंतर पुनर्जन्म न घेता मलाच प्राप्त होत असतो. ॥ ९ ॥

**आपणासच प्राप्त होतो, याला काय आधार आहे ?**

आहे. जे माझ्यामध्येच तल्लीन झाले आहेत आणि ज्यांनी माझाच आश्रय घेतलेला आहे, असे पुष्कळ मानव माझ्या अवताराला आणि कर्माच्या अलौकिकतेला तत्त्वतः जाणून पवित्र होतात तसेच आसक्ती, भय आणि क्रोध यांपासून रहित होऊन माझ्या स्वरूपास प्राप्त झालेले आहेत. ॥ १० ॥

**ते कोणत्या भावनेने आपल्या आश्रित (शरण) होतात ?**

हे पार्था ! जे मनुष्य संसारापासून विन्मुख होऊन ज्या भावनेने मला शरण येतात, मीसुद्धा त्यांच्याबरोबर त्याच भावनेने व्यवहार करीत असतो. माझ्या या वागण्याचा जगतातील यावत् मनुष्यांवर फार मोठा

परिणाम होत असतो, ज्यामुळे तेसुद्धां स्वार्थ आणि अभिमान यांचा त्याग करून परहितामध्ये तत्पर होतात. ॥ ११ ॥

**आपण आपणास शरण येणाऱ्या लोकांना इतके अनुकूल होत असता तरी सुद्धा मानव आपणास सोडून अन्य देवतांची भक्ती का करतात ?**

त्यांच्यामध्ये संसाराविषयी महत्त्व असल्यामुळें ते कर्मजन्य फलाची इच्छा करतात, म्हणून मला सोडून अन्य देवतांची भक्ती करतात कारण की, या मानवलोकात कर्मापासून उत्पन्न होणारे फल सत्वर प्राप्त होते. ॥ १२ ॥

**ज्याप्रमाणे मानव कर्मजन्य फलाच्या उद्देशाने अन्य देवतांची भक्ती करीत असतात म्हणजेच शुभकर्म करतात, त्याचप्रमाणे आपण सुद्धा कोणत्या तरी फलाच्या उद्देशाने काही कार्य करीत असाल ?**

मी प्राण्यांच्या गुण आणि कर्मानुसार चारी वर्णांची (**ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र**) रचना करतो, परंतु मी हे सृष्टिरचना इत्यादी विषयीचे कार्य कर्तृत्व आणि फलेच्छारहित होऊनच करीत असतो म्हणून त्या कर्मांनी मी कोणत्याही प्रकारे बांधला जात नाही. इतकेच नाही तर, अशाप्रकारे माझ्या तत्त्वास ओळखणारेसुद्धा कधीहि कर्मांनी बांधले जात नाहीत* ॥ १३-१४ ॥

**अशाप्रकारे कोणी कर्म केले आहे कां ?**

होय. पूर्वी जे मुमुक्षु होते, त्यांनीसुद्धा अशाप्रकारे कर्माच्या तत्त्वाला ओळखून कर्म केलेले आहे. म्हणून तूसुद्धा पूर्वजांकडून सतत केल्या जाणाऱ्या कर्मांना त्यांच्याप्रमाणेच कर. ॥ १५ ॥

---

* ज्याप्रमाणे भगवान फलेच्छारहित होऊन कर्म करीत असतात त्याचप्रमाणे आम्हीसुद्धा फलाबाबत इच्छा सोडून कर्म केले पाहिजे, अशाप्रकारे जाणून जो कर्म करीत असतो तो कर्मापासून बद्ध होत नाहीं.

**जे कर्म मुमुक्षूंनी केलेले आहे आणि जे कर्म करण्याबाबत आपण आज्ञा देत आहात, ते कर्म कोणते आहे ?**

कर्म काय आहे आणि अकर्म काय आहे—या विषयामध्ये मोठे-मोठे विद्वानसुद्धा मोहित होतात आता मी तेच कर्मतत्त्व तुला सांगतो, ज्याला जाणून तूं संसाररूपी बंधनापासून मुक्त होशील. ते कर्म तीन प्रकारचे आहे. 'कर्म, अकर्म आणि विकर्म,' या तीनहि कर्मांच्या तत्त्वाला जरूर जाणून घेतले पाहिजे, कारण की कर्मांचे यथार्थ स्वरूप फारच गहन आहे. ॥ १६-१७ ॥

**कर्म आणि अकर्मांच्या यथार्थ स्वरूपाला जाणणे म्हणजे काय ?**

कर्मामध्ये अकर्म पाहणे आणि अकर्मामध्ये कर्म पाहणे म्हणजेच कर्म करीत असता निर्लेप राहणे आणि निर्लेप राहून कर्म करणे, अशा पद्धतीने कर्म करणाराच बुद्धिमान आहे, योगी आहे आणि सर्व कर्मे करणारा आहे. ॥ १८ ॥

**त्याची ती बुद्धिमानी कशाप्रकारची आहे ?**

ज्याची सर्व कर्मे संकल्प आणि कामनारहित होत असतात, तसेच ज्याची सर्व कर्मे ज्ञानरूपी अग्नीने जळून जातात त्याला ब्रह्मवेत्तेसुद्धा पंडित (बुद्धिमान्) म्हणत असतात म्हणजे हीच त्याची बुद्धिमानी आहे ॥ १९ ॥

**अशा पुरुषाची स्थिती कशाप्रकारची होत असते ?**

तो कर्म तसेच कर्मफलाविषयी आसक्तिरहित आणि त्यांच्या आश्रयाने रहित होत असतो, त्याचप्रमाणे तो सतत तृप्त राहत असतो. म्हणून सर्व काही करीत असूनसुद्धा वास्तविक काहीच करीत नाही. ॥ २० ॥

**जर एखादा साधक निवृत्ति-परायण असेल तर ?**

शरीर आणि अंतःकरणाला ताब्यात ठेवणारा, सर्व प्रकारच्या परिग्रहाचा त्याग करणारा आणि संसाराच्या सर्व आशांपासून रहित झालेला साधक केवळ शरीरसंबंधी कर्म करीत असूनसुद्धा बद्ध होत नाही ॥ २१ ॥

**जर एखादा साधक प्रवृत्तिपरायण असेल तर ?**

तो सुध्दा ज्याप्रकारची परिस्थिति येत असते, त्यामध्ये समाधानी राहत असतो, ईर्ष्या आणि शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादी द्वन्द्वांनी हर्ष-विषादयुक्त होत नाही तसेच सिद्धी-असिद्धीमध्ये एकसारखा राहून कर्म करूनसुद्धा बद्ध होत नाही. इतकेच नाही तर, जो कर्मफलाविषयी आसक्तिरहित, देहाभिमान आणि ममतारहित असा स्वाधीन आहे. तसेच केवल परमात्म-प्राप्तीविषयीच ज्याचा निश्चय आहे. अशा केवळ यज्ञासाठीच कर्म करणाऱ्या साधकाचे सर्व कर्म विलीन (अकर्म) होऊन जात असते. ॥ २२-२३ ॥

**भगवन् ! तो यज्ञ किती प्रकारचा असतो ?**

१ ज्यात सम्पूर्ण करण, उपकरण, सामग्री, क्रिया, कर्ता, कर्म इत्यादी ब्रह्मस्वरूप होऊन जातात तो' ब्रह्मयज्ञ' होय.

२ ज्या यज्ञांत सर्व पदार्थ, क्रिया इत्यादी मला अर्पण केल्या जातात तो भगवदर्पणरूप' यज्ञ होय.

३ ज्यामध्ये साधक स्वतःस ब्रम्हामध्ये लीन करून टाकतात तो 'अभिन्नतारूप यज्ञ' होय.

४ ज्यामध्ये साधक आपल्या सर्व इन्द्रियांचे संयमन करतो. त्या इंन्द्रियांना त्यांच्या विषयांपासून परावृत्त करतो. तो' संयमरूप यज्ञ' होय.

५ ज्यामध्ये साधक राग-द्वेषरहित इन्द्रियांद्वारा विषयांचे सेवन करतो तो' विषय-हवनरूप यज्ञ' होय.

६ प्राण, इंद्रियें आणि मनाच्या सर्व क्रिया थांबवून बुद्धीची जागृती राहून निर्विकल्प होणे' समाधिरूप यज्ञ' होय.

७ लोकांच्या उपकाराकरिता आपले-द्रव्य खर्च करणे' द्रव्ययज्ञ' होय.

८ स्वधर्माच्या पालनामध्ये ज्या अनेक अडचणी येतात, त्याना प्रसन्नपणे सहन करणे याला 'तपोयज्ञ' म्हणतात.

९ कार्याची सिद्धी आणिअसिद्धी तसेच फलाची प्राप्ती आणि अप्राप्ती यात सम राहणे तो 'योगयज्ञ' होय.

१० शास्त्रांचे पठन-पाठन तसेच नाम-जप इत्यादी करणे हा 'स्वाध्यायरूप यज्ञ' होय.

११ पूरक, कुम्भक आणि रेचक याप्रमाणे * प्राणायाम करणे हा 'प्राणायामरूप यज्ञ' होय.

१२ नियमित आहार करून प्राणादिकांना आपापल्या ठिकाणीच थांबविणे यालाच' स्तम्भवृत्ती प्राणायामरूप यज्ञ' म्हणतात.

हे सर्व यज्ञ केवळ कर्मापासून संबंध-विच्छेद करण्याकरिताच आहेत. असे जाणून या यज्ञांचे अनुष्ठान करणा-या साधकाची सर्व पापे नाश पावत असतात. ॥ २४—३० ॥

**भगवन् ! पापांचा नाश झाल्यावर काय होते ?**

हे कुरुवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! त्या यज्ञ करणारांना अमृतस्वरूप परमात्म्याची प्राप्ती होत असते. परंतु जो यज्ञ करतच नाही, त्याच्याकरिता हा मानवलोकसुद्धा लाभदायक होत नाही, तर परलोक कसा लाभदायक होऊ शकेल ? ॥ ३१ ॥

**अशाप्रकारच्या यज्ञांचे वर्णन आणखी कोठे झालेले आहे ?**

अशाप्रकारच्या आणखीसुद्धा पुष्कळ प्रकारच्या यज्ञांचे वर्णन वेदामध्ये विस्ताराने झालेले आहे. तू त्या सर्व यज्ञांना कर्मजन्य (कर्मापासून होणारे) ओळख. अशाप्रकारे ओळखून यज्ञ केल्यामुळे तू कर्मबन्धनापासून मुक्त होशील. ॥ ३२ ॥

**भगवन् ! सर्व यज्ञांमध्ये श्रेष्ठ यज्ञ कोणता आहे ?**

अर्जुना ! त्या सर्व कर्मजन्य यज्ञापेक्षाही 'ज्ञानयज्ञ' श्रेष्ठ आहे, कारण की, सर्व कर्म आणि पदार्थ ज्ञानयज्ञामध्ये समाप्त होत असतात ॥ ३३ ॥

---

* श्वास आत घेणे म्हणजे पूरक, श्वास आत कोंडून धरणे म्हणजे कुम्भक व श्वास बाहेर सोडणे म्हणजे रेचक होय.

**ते ज्ञान कसे मिळवावे ?**

त्या ज्ञानाच्या प्राप्तीकरिता तू ज्ञानी तत्त्वदर्शी महापुरुषांजवळ जा, त्यांच्या चरणांवर दण्डवत् साष्टांग प्रणिपात कर, त्यांची सेवा-शुश्रुषा कर याणि त्यांना आदरपूर्वक तत्त्वाच्या जिज्ञासेबद्दल प्रश्न विचार, तेव्हा ते ज्ञानी महापुरुष तुला ज्ञानाचा उपदेश देतील. ॥ ३४ ॥

**त्यांनी दिलेल्या ज्ञानामुळे काय होईल ?**

अर्जुना ! ते ज्ञान प्राप्त झाल्यानंतर तुला पुन्हा कधीहि मोह होणार नाही. तसेच त्या ज्ञानामुळें तू सर्व प्राणिमात्राला प्रथम स्वतःमध्ये आणि नंतर माझ्यामध्ये पाहशील. म्हणजे सर्वठिकाणी तुला परमात्मतत्त्वाचाच अनुभव येईल ॥ ३५ ॥

**या ज्ञानाची अजून काही महिमा आहे काय ?**

आहे, जरी तू सर्व पाप्यांपेक्षाही अत्यन्त पापी असला तरीसुद्धा तू ज्ञानरूपी नौकाद्वारा सर्व पापांपासून निःसंशयपणे तरुन जाशील ॥ ३६ ॥

**ज्याप्रमाणे नौकेद्वारा समुद्र तरुन गेल्यानंतर समुद्र तर शिल्लक राहतच असतो. त्याचप्रमाणे पापांपासून तरल्यानंतरसुद्धा पाप तर राहतच असतील ?**

नाही. अर्जुना ! ज्याप्रमाणे प्रज्वलित झालेला अग्नी लाकडांना सर्वप्रकारे भस्म करतो. त्याचप्रमाणे ज्ञानरूपी अग्नी सर्व कर्मांना (पापांना) भस्म करतो. म्हणून ह्या मानवलोकामध्ये ज्ञानासारखे पावन करणारे काहीच नाही. कर्मयोगाने सिद्ध झालेला मनुष्य त्या ज्ञानाला स्वतः आपोआप आपला आपण निश्चित मिळवीत असतो. ॥ ३७-३८ ॥

**जे ज्ञान कर्मयोगानें सिद्ध झालेल्या मनुष्याला आपोआप प्राप्त होत असते, ते अन्य प्रकारच्या साधकाला कसे प्राप्त होते ?**

इंद्रियांना ताब्यात ठेवणाऱ्या, साधनपरायण आणि श्रद्धावान असणाऱ्या साधकाला ते ज्ञान प्राप्त होत असते आणि ज्ञान प्राप्त झाल्यानंतर

सत्त्वरच तो परमशान्तीला प्राप्त होतो. ॥ ३९ ॥

**ह्या ज्ञानप्राप्तीमध्ये अडचण काय आहे ?**

जो स्वतः तर आत्म्याला, जाणत नाही आणि दुस-यांवर विश्वास ठेवत नाही, दुसऱ्यांनी सांगितलेले मानीत नाही, तसेच ज्याच्या मनामध्ये संशय असतो अशा मनुष्याचे पतन होत असते. संशयी मनुष्याकरिता हा लोक सुखदायी होत नाही आणि परलोकसुद्धा सुखदायी होत नाही ॥ ४० ॥

**संशय नष्ट झाल्यावर काय होते ?**

धनंजया ! ज्याने समतेद्वारा सर्व कर्मापासून सम्बन्ध विच्छेद केलेला आहे आणि ज्ञानाद्वारे (कर्मतत्त्वाचे ज्ञानद्वारा) सर्व संशयांचा नाश केलाआहे, अशा स्वरूपपरायण मनुष्याला कर्मे बद्ध करीत नाहीत. हे भरतवंशी अर्जुना ! तूं हृदयामध्ये स्थित असलेल्या अज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या संशयाला ज्ञानरूप तलवारीने तोडून टाक व समतेमध्ये स्थित हो आणि युद्ध (कर्तव्य पालन) करण्याकरिता उभा रहा. ॥ ४१-४२ ॥



# अध्याय पाचवा

**अर्जुन म्हणाला, भगवान श्रीकृष्णा ! आपण कधी तर कर्मांच्या त्यागाची म्हणजेच सांख्ययोगाची प्रशंसा करता आणि कधी कर्मयोगाची प्रशंसा करता. म्हणून दोन्ही साधनांपैकी जे निश्चित कल्याणकारक आहे. ते माझ्याकरिता सांगा. ॥ १ ॥ ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले— सांख्ययोग आणि कर्मयोग ही दोन्हीहि साधने श्रेष्ठ आहेत. परंतु दोन्हीमध्येसुद्धा सांख्ययोगापेक्षा कर्मयोग श्रेष्ठ आहे. ॥ २ ॥

**भगवन् ! कर्मयोग श्रेष्ठ का आहे ?**

हे महाबाहो ! जो कोणाचीही आकांक्षा आणि कोणाचाही द्वेष करीत नाही. तो कर्मयोगी नित्य संन्याशीच जाणण्यास योग्य आहे कारण की, द्वन्द्वरहित झाल्यामुळे तो सुखपूर्वक संसारबन्धनांतून मुक्त होत असतो. ॥ ३ ॥

**आपण सांगितले की, दोन्हीहि श्रेष्ठ आहेत, तर मग दोन्हींच्या फलप्राप्तीमध्ये काही भेद नाही काय ?**

अज्ञ लोकच सांख्ययोग व कर्मयोग यांना निरनिराळे फल देणारे समजतात. पण्डितलोक (बुद्धिमानलोक) असे समजत नाहीत. कारण की, ह्या दोहोंपैकी कोणा एकामध्येसुद्धा स्थित झाल्यानंतर, साधक दोन्हींच्याही फलाची प्राप्ती करून घेत असतो. अर्थात् जे फल सांख्ययोगी साधकाला प्राप्त होत असते. तेच फल कर्मयोगी साधकालासुद्धा प्राप्त होत असते म्हणून जो सांख्ययोग व कर्मयोग यांच्यापासून मिळणारे फल एकच आहे असे पाहतो तोच त्या योगांना यथार्थ जाणतो. ॥ ४-५ ॥

**जर दोन्हींपासून मिळणारे फल एकच आहे, तर मग कर्मयोग श्रेष्ठ कसा ?**

हे महाबाहो ! कर्मयोगाशिवाय म्हणजे सिद्धी-असिद्धीमध्ये सम झाल्याशिवाय सांख्ययोग प्राप्त होणे (समरूप स्वरूपात स्थित होणे) कठीण आहे. परंतु मननशील कर्मयोगी सिद्धी-असिद्धीमध्ये सम होऊन लवकरच समरूप ब्रम्हाला प्राप्त करून घेत असतो. ॥ ६ ॥

**तो कर्मयोगाद्वारे ब्रह्माला कशाप्रकारे प्राप्त करून घेतो ?**

इंद्रियांना जिंकणारा, ज्याचे अन्तःकरण शुद्ध आहे असा, ज्यानें आपल्या देहाला आपल्या ताब्यात ठेवले आहे असा आणि सर्व प्राणिमात्रात स्वतःला स्थित स्वतःच पाहणारा कर्मयोगी कर्म करीत असूनसुद्धा कर्मापासून बद्ध होत नाही, म्हणजेच तो परमात्मस्वरूपाला प्राप्त होतो. ॥ ७ ॥

**सांख्ययोगी कर्मापासून निर्लिप्त कसा राहतो ?**

सत्-असत्च्या तत्त्वाला ओळखून सत्मध्ये स्थित राहणारा सांख्ययोगी डोळ्यांनी पाहत असता, कानांनी ऐकत असता, त्वगिंद्रियांनी स्पर्श करीत असता, नाकाने वास घेत असता, तोंडाने खात असता, श्वासोच्छवास करीत असता, वागिंद्रियांने बोलत असता, पायूपस्थ इंद्रियांनी विष्ठेचा व मूत्राचा त्याग करीत असता, हातांनी ग्रहण करीत असता, डोळयांची उघडझाप करीत असतासुद्धा' इंद्रियेच आपआपल्या विषयांमध्ये प्रवृत्त होत आहेत' असे समजतो आणि 'मी स्वतः काहीही करीत नाही, अशाप्रकारचा अनुभव करून कर्मापासून निर्लिप्त राहत असतो. ॥ ८-९ ॥

**कर्मयोगी आणि सांख्ययोगी—दोघेही कर्मापासून निर्लिप्त राहतात. अशाप्रकारे निर्लिप्त राहण्याचा दूसरा काही उपाय आहे का ?**

आहे, भक्तियोग आहे. भक्तियोगी फलासक्तीचा त्याग करून तसेच सर्व कर्मे ईश्वरामध्ये अर्पण करून कर्म करीत असतो म्हणून तो सुद्धा

ज्याप्रमाणे पाण्यामध्ये कमळाचे पान त्याप्रमाणे पापांनी, कर्मांनी लिप्त होत नाही. ॥ १० ॥

**भगवंता ! भक्तियोगी तर आपल्यात समर्पणाच्या उद्देशाने कर्म करतो म्हणून लिप्त होत नाही; परन्तु कर्मयोगी कोणत्या उद्देशाने कर्म करताना लिप्त होत नाही ?**

कर्मयोगी इंद्रिये, देह, मन, बुद्धी यांच्याबरोबर ममता न ठेवता आणि फलासक्तीचा त्याग करून केवळ अन्तःकरण शुद्धीसाठीच कर्म करीत असतो. म्हणून कर्मयोगी कर्मफलाच्या इच्छेचा त्याग करून नैष्ठिक भगवत्स्वरूप शांतीस प्राप्त होत असतो. परंतु जो योगी नसतो तो कामनेमुळे कर्मफलामध्ये आसक्त होऊन बद्ध होत असतो. ॥ ११-१२ ॥

**भगवन् ! सांख्ययोग्याकडून कर्म कशाप्रकारे होत असते ?**

शरीर, इंद्रिये आणि मन यांना ताब्यांत ठेवणारा सांख्ययोगी मनाने नित्यादी सर्व कर्मांना नऊ द्वारांनी युक्त अशा शरीरात सोडून स्वतः काही एक न करतां आणि न करविता सुखाने स्वस्वरूपात स्थित राहत असतो. ॥ १३ ॥

**सांख्ययोगी तर कर्म करीत नाही. किंवा करवीत नाही. पण परमात्मा तर कर्म करवून घेत असेल ?**

परमात्मा कोणाच्याहि कर्तृत्वाची (कर्तेपणाची) निर्मिती करीत नाही, कोणाकडून कर्म करवून घेत नाही आणि कर्मफलाबरोबर कोणाचा सम्बन्ध-सुद्धा जोडीत नाही. परंतु मनुष्य आपल्या स्वभावानुसारच (सवयीनुसार) कर्म करीत असतो आणि स्वतःला त्या कर्मांचा कर्ता मानत असतो. त्यामुळे त्याचा कर्मफलाबरोबर आपोआप संबंध जोडला जात असतो. ॥ १४ ॥

**तो परमात्मा कोणामध्येहि कर्तापन इत्यादिंची निर्मिती करीत नाही परन्तु प्राण्यांच्या कर्मफलाचे तरी ग्रहण करीत असतीलच ?**

सर्वव्यापी परमात्मा कोणाच्याही पाप आणि पुण्यकर्मांचे ग्रहण करीत नाही. परन्तु अज्ञानास्तव स्वरूपाचे ज्ञान आच्छादित झाल्यामुळे ते जीव मोहीत होत असतात, म्हणजेच स्वतःला कर्माचा कर्ता आणि भोक्ता मानत असतात त्यामुळे ते लोक जन्ममृत्युरूपी फेऱ्यात अडकून राहतात. ॥ १५ ॥

**तर सर्व जीव अशाप्रकारे स्वत:ला कर्ता व भोक्ता समजून मोहित होत असतात काय ?**

नाही, ज्यांनी ज्ञान (विवेक) प्राप्त करून घेऊन आपल्या अज्ञानाचा नाश केलेला आहे. त्यांचे ते ज्ञान सूर्याप्रमाणे त्या कर्तृत्व व भोक्तृत्व-विरहीत परमात्मतत्त्वाला प्रकाशित करीत असते. म्हणजेच त्याचा अनुभव करून देत असते. ॥ १६ ॥

**त्या परमात्मतत्त्वाचा अनुभव दुसऱ्या कोणाला होत असतो ?**

ज्यांची बुद्धी आणि मन परमात्मतत्त्वामध्ये तद्रूप झालेले आहे. ज्यांची स्थिती परमात्मतत्त्वामध्येच आहे. अशाप्रकारचे परमात्मपरायण साधक ज्ञानाने पाप-पुण्यरहित होऊन परमात्म्यास (मोक्षास) प्राप्त होत असतात त्यांचा पुनर्जन्म होत नाही. ॥ १७ ॥

**जे परमात्म्याला प्राप्त होत असतात त्या महापुरुषांचे ज्ञान व्यवहार काली कशाप्रकारचे राहते ?**

ते तत्त्ववेत्ते महापुरुष विद्या व विनय यांनी सम्पन्न असलेल्या ब्राह्मणामध्ये आणि चांडाळामध्ये तसेच गाय, हत्ती आणि कुत्र्यया मध्येसुद्धा एक समरूप ब्रह्मच पाहत असतात. खान पानादी व्यवहारात त्यांच्याशी एकता करीत नाहीत. ॥ १८ ॥

**समदर्शी होण्यामुळे काय होत असते ?**

ज्यांचे मन सर्वप्रकारे साम्यावस्थेमध्ये अर्थात् परमात्मतत्त्वामध्ये स्थित झालेले आहे. त्यांनी जीवंतपणीच ह्या संसारास जिंकले आहे अर्थात् ते संसाराहून उच्च पदावर पोहोचले आहेत. कारण की, ब्रह्म निर्दोष आणि

सम आहे. म्हणून ते समरूप ब्रह्मामध्येच स्थित राहतात. ! ॥ १९ ॥

**अशा साम्यावस्थेमध्ये स्थित होण्याचा उपाय काय आहे ?**

व्यवहारामध्ये प्रिय-अप्रिय म्हणजे अनुकूल-प्रतिकुल परिस्थिति प्राप्त झाल्यावरसुद्धां जो हर्ष किंवा शोक करीत नाही. तो मोहरहित, स्थिरबुद्धी असणारा आणि ब्रह्माला जाणणारा मनुष्य परमात्मतत्त्वामध्येच स्थित राहत असतो. ॥ २० ॥

**भगवन् ! ही स्थिती कोणत्या क्रमाने प्राप्त होत असते ?**

जो बाह्य विषयांमध्ये आसक्ती धरीत नाही. तो प्रथम स्वतःमध्ये स्थित असलेल्यां सात्त्विक सुखाला प्राप्त करून घेत असतो. मग तो परमात्म्यामध्ये एक होऊन क्षय न पावणाऱ्या सुखाचा अनुभव करीत असतो ॥ २१ ॥

**बाह्य विषयांच्या आसक्तीपासून कशाप्रकारे वाचावे ?**

कुन्तीनन्दना ! इंद्रियें आणि विषय यांच्या संबंधापासून उत्पन्न होणारे जेवढेही भोग (सुख) आहेत. ते सर्व दुःखांचेच कारण आहे आणि उत्पत्ती व नाश पावणारे आहेत, म्हणून विवेकी माणूस त्यामध्ये रममाण होत नाही ॥ २२ ॥

**त्या भोगांमध्ये रममाण न होणाऱ्या मनुष्याची काय विशेषता आहे ?**

जो मनुष्य शरीराचा नाश होण्याअगोदरच काम व क्रोध यापासून उत्पन्न होणाऱ्या वेगास सहन करण्यास समर्थ होत असतो म्हणजेच काम व क्रोधाच्या वेगाला उत्पन्नच होऊ देत नाही, तोच सुखी आहे, तोच योगी आहे आणि तोच नर अर्थात् शूर पुरुष आहे. ॥ २३ ॥

**असे झाल्यानंतर काय होते ?**

काम आणि क्रोध यांचा वेग उत्पन्न न झाल्यामुळे त्याला परमात्मतत्वाचे सुख मिळत असते. तो परमात्मतत्त्वामध्येच रममाण होत असतो आणि त्याचे ज्ञान सतत जागृत राहत असते. असा तो साधक

ब्रह्मस्वरूप होऊन शान्त ब्रह्माला प्राप्त होत असतो. ॥ २४ ॥

**त्या शान्त ब्रह्माला दुसरे कोण प्राप्त होतात ?**

शरीर, इंद्रियें, मन, बुद्धी ज्यांचें ताब्यात असतात, जे सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्ये रत असतात, ज्यांच्या मनातील सर्व संशय मिटलेले आहेत आणि ज्यांची सर्व पापे नष्ट झालेली आहेत. असे तत्त्ववेत्ते साधक निर्वाण ब्रह्माला प्राप्त होत असतात. ॥ २५ ॥

**निर्वाण ब्रह्मास प्राप्त होणाराची लक्षणे काय असतात ?**

ते काम-क्रोधापासून सर्वथा रहित झालेले असतात, त्यांचे मन ताब्यात असते, ते स्वरूपसाक्षात्कार केलेले असतात, अशा सांख्ययोग्यांना जीवंतपणी आणि मरणानंतर निर्वाणब्रह्मच प्राप्त होत असते. ॥ २६ ॥

**हे निर्वाणब्रह्म दुसऱ्या कोणत्या साधनानेहि प्राप्त होऊ शकते काय ?**

होय ध्यानयोगाने निर्वाणब्रह्म प्राप्त केले जाऊ शकते. बाह्य विषयांना बाहेरच सोडून म्हणजे सर्व विषयांचा त्याग करून, डोळ्यांच्या दृष्टीला दोन्ही भुवयांच्यामध्ये स्थित करून आणि नासिका यांत संचार करणारे प्राण व अपान ह्या वायुला म्हणजे रेचक व पूरक यांना समतुल्य करून, ज्याची इंद्रियें मन आणि बुद्धी स्वतच्या ताब्यात आहेत, असा तो इच्छा, भय आणि क्रोधरहित मोक्ष-परायण साधक नित्य मुक्तच असतो. ॥ २७-२८ ॥

**आणखीहि दुसरे एखादे सुगम साधन आहे का, ज्यामुळे सर्व सुगमतापूर्वक मुक्त होऊन जातील ?**

आहे, भक्तियोग आहे. जो मला सम्पूर्ण लोकांचा महान् ईश्वर, सर्व प्राणिमात्रांचा परम सुहृद (स्वार्थरहित दयाळू आणि प्रेमी) तसेच सर्व यज्ञ आणि तपांचा भोक्ता जाणतो, दृढ़पूर्वक मानत असतो म्हणजेच स्वतःला कधी भोक्ता मानत नाही. त्याला परमशान्तीची प्राप्ती होत असते. ॥ २९ ॥

★

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय सहावा

भगवान श्रीकृष्ण म्हणालेः—मी आतापर्यन्त कर्मयोगाबद्दल पुष्कळसा विषय, सांगितला. आता मी कर्मयोगाचे सार सांगत आहे.जो मनुष्य कर्मफलाचा म्हणजेच उत्पत्ती व नाशवान पदार्थांचा आश्रय न घेता कर्तव्य-कर्म करीत असतो. तोच संन्यासी आहे आणि तोच योगी आहे. केवळ अग्नी आणि क्रियांचा त्याग करणारा संन्यासी आणि योगी नव्हे. म्हणून अर्जुना ! लोक ज्याला संन्यास (सांख्ययोग) म्हणतात, त्याला तू योग (कर्मयोग) समज.

**संन्यासी आणि योगी यामध्ये कोणत्या विषयाची महिमा आहे ?**

संकल्पांच्या त्यागाची महिमा आहे. कारण की, संकल्पांचा त्याग केल्याशिवाय म्हणजेच मनांतील विषय सोडल्याशिवाय माणूस कोणत्याही प्रकारचा योगी होऊ शकत नाही. ॥ १-२ ॥

**योगी होण्यात मुख्य हेतू काय आहे ?**

जो योगामध्ये (समतेमध्ये) आरूढ होऊ इच्छितो, अशा मननशील योग्याकरिता निष्कामभावाने कर्तव्यकर्म करणे हेच योगारूढ होण्याचे साधन आहे आणि त्याच योगारूढ मनुष्याची शांति परमात्मतत्वाच्या प्राप्ती-मध्ये साधन आहे, म्हणजेच संसाराच्या त्यागापासून मिळणाऱ्या शान्तीचा उपभोग न घेणे हे परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीमध्ये साधन आहे. ॥ ३ ॥

**त्या योगारूढ मनुष्याचे लक्षण काय आहे ?**

ज्याची इंद्रियांच्या विषयोपभोगांमध्ये आसक्ती नाही आणि कर्मांमध्येही आसक्ती नाही. तसेच स्वतःच्या मनाचा कोणताही संकल्पसुद्धा नाही तो मनुष्य योगारूढ आहे. ॥ ४ ॥

**मनुष्यानें योगारूढ होण्याकरिता काय केले पाहिजे ?**

स्वतः आपणच आपला उद्धार केला पाहिजे. आपले पतन करू नये. कारण की, जीवात्मा स्वतःच आपला मित्र आहे आणि स्वतःच आपला शत्रु आहे. ॥ ५ ॥

**स्वतःच आपला मित्र आणि आपला शत्रू कसा आहे ?**

ज्यानें शरीरेंद्रियांच्या समुदायावर स्वतः विजय प्राप्त केलेला आहे. म्हणजेच जो असत् बरोबरचा सम्बन्ध मानत नाही, तो आपणच आपला मित्र आहे आणि ज्याने शरीरेंद्रियांवर विजय प्राप्त केलेला नसतो म्हणजेच जो असत्‌बरोबरचा सम्बन्ध मानतो तो आपणच आपला शत्रू आहे. ॥ ६ ॥

**आपणच आपले मित्र होण्यामुळे काय होईल ?**

ज्याने शरीरेंद्रिय समूहाला जिंकले आहे तो प्रारब्धवश येणाऱ्या अनुकूलते-प्रतिकूलतेमध्ये, वर्तमानकाळामध्ये केल्या जाणाऱ्या कर्मांच्या यश-अपयशामध्ये, तसेच दुसऱ्याकडून होणाऱ्या मान-अपमान यामध्ये निर्विकार राहतो. म्हणून त्याला परमात्म्याची प्राप्ती होत असते. ॥ ७ ॥

**हे भगवन् ! परमात्म्याला प्राप्त झालेल्या मनुष्याची लक्षणें कोणती आहेत ?**

त्याचे अन्तःकरण सतत ज्ञान-विज्ञानामुळें तृप्त राहत असते. त्याचा सर्व इंद्रियांवर अधिकार राहत असतो. तो सर्व परिस्थितीमध्ये निर्विकार राहत असतो. मातीचे ढेकुळ, दगड तसेच सोने यामध्ये त्याची समबुद्धी राहत असते. केवळ पदार्थांमध्येच नाही, तर प्रत्युपकाराची अपेक्षा न धरणारा सुहृद, स्नेही, शत्रू, कोणत्याही पक्षाचा अभिनिवेश न धरणारा उदासीन, दोन्ही परस्पर विरुद्ध पक्षांचे हित इच्छिणारा मध्यस्थ, अप्रिय असलेला द्वेष्य, बन्धू, शास्त्राचरण करणारे साधू आणि शास्त्रनिषिद्ध आचरण करणारे पापी, अशा व्यक्तींमध्येसुद्धा त्याची समबुद्धी राहत असते. अशाप्रकारे सर्वांकडे समबुद्धीने पाहणारा मनुष्य सर्वश्रेष्ठ होय. ॥ ८-९ ॥

**ती समबुद्धी केवळ कर्मयोगानेच होत असते किंवा दुसऱ्या साधनांनी सुद्धा होत असते ?**

ती समबुद्धि ध्यानयोगापासूनसुद्धा होत असते. म्हणून मी त्या ध्यानयोगाची रीत सांगतो. ध्यानयोगी याने भोगबुद्धीने संग्रह न करता, कामनारहित होऊन, अन्तःकरण तसेच शरीराला ताब्यात ठेवून त्याचप्रमाणे एकान्तात एकटेच राहून स्वतःचे मन सतत परमात्म्यामध्ये लावावे. ॥ १० ॥

**मनाला परमात्म्यामध्ये लावण्याकरिता अर्थात् ध्यान करण्याकरिता उपयोगी गोष्टी कोणत्या आहेत ?**

शुद्ध, पवित्र, ठिकाणी ध्यानयोगी यानें क्रमशः खाली दर्भ त्यावर हरिणाचे चर्म आणि त्यावर पवित्र वस्त्र अंथरावे, ते आसन अत्यन्त ऊंच नसावे आणि अत्यन्त खालीही नसावे तसेच स्थिर असावे अर्थात् हलणारे व डुलणारे नसावे. ॥ ११ ॥

**अशाप्रकारे आसन टाकल्यावर काय करावे ?**

त्या आसनावर बसून चित्त आणि इंद्रिये यांच्या सर्व क्रियांना ताब्यात ठेवून मन एकाग्र करून अन्तःकरणाच्या शुद्धीकरितां ध्यानयोगाचा अभ्यास करावा. ॥ १२ ॥

**त्या आसनावर कशाप्रकारे बसले पाहिजे ?**

शरीर, मान व मस्तक एका रेषेत सरळ व निश्चळ करून तसेच इकडेतिकडे न पाहता केवळ आपल्या नाकाचा अग्रभाग पाहत स्थिर होऊन बसावे. ॥ १३ ॥

**अशाप्रकारच्या आसनावर कोणत्या भावनेने बसले पाहिजे ?**

ज्याचे अन्तःकरण राग-द्वेष इत्यादी द्वन्द्वापासून रहित आहे, जो भयरहित आहे आणि ब्रह्मचर्य व्रताचे पालन करीत आहे. अशाप्रकारच्या सावधान योग्याने मनाला संसारापासून दूर करून माझ्यामध्ये लावत मत्परायण होऊन बसावे. ॥ १४ ॥

**यापासून मिळणारे फल काय असेल ?**

अशाप्रकारे स्वतःचे मन सतत मजकडे लावून, मन ताब्यात असणाऱ्यायोगाभ्यासी पुरुषाला माझ्यात राहणाऱ्या निर्वाण शांतीची प्राप्ती होत असते. ॥ १५ ॥

**अशाप्रकारे ध्यान करणारे तर पुष्कळ असतात परंतु हे भगवन् ! त्या सर्वांना ध्यानयोग सिद्ध का होत नाही ?**

अर्जुना ! अधिक अन्न खाणाराला आणि मुळीच अन्न न खाणाराला तसेच अधिक झोप घेणाराला आणि मुळीच झोप न घेणाराला हा योग सिद्ध होत नाही. ॥ १६ ॥

ज्याचा आहार (भोजन) आणि विहार (जाणे-येणे) यथोचित आहे, ज्याचे कर्मामधील वर्तन यथोचित आहे आणि ज्याचे झोपणे व जागणे-सुद्धा यथोचित आहे, त्यालाच हा सर्वदुःखांचा नाश करणारा योग सिद्ध होत असतो. ॥ १७ ॥

**दुःखांचा नाश करणारा हा योग केव्हा सिद्ध होत असतो ?**

ज्यावेळीं चांगल्याप्रकारे वश केलेले चित्त स्वरूपात स्थिर होत असते आणि स्वतः सर्व विषयांपासून विन्मुख होत असतो. म्हणजेच स्वतःकरिता कोणत्याही विषयाची थोडीसुद्धा आवश्यकता समजत नाही. त्यावळी तो योगी म्हटला जातो म्हणजेच त्याचा योग सिद्ध होत असतो. ॥ १८ ॥

**योगी पुरुषाच्या चित्ताची अवस्था काय होत असते ?**

ज्याप्रमाणे जेथे वारा थोडाही वाहत नाही, अशा ठिकाणी ठेवलेल्या दिव्याची वात थोडीसुद्धा हालत-डुलत नाही, त्याच प्रकारची स्थिती ध्यानयोगाचा अभ्यास करणाऱ्या योगी पुरुषाच्या स्थिर चित्ताची होत असते. ॥ १९ ॥

**चित्ताची अशी अवस्था झाल्यानंतर काय होत असते ?**

योगाच्या अभ्यासाने सर्व बाजूंनी आवरले गेलेले चित्त जेव्हा

समाधीच्या सुखापासूनसुद्धा उपरत होते. तेव्हा योगी आपण आपल्यात आपण आपल्याला पाहत आपण आपल्यात संतुष्ट होतो. ॥ २० ॥

**आपण आपल्यात सन्तुष्ट होण्यामुळे काय होत असते ?**

योगी पुरुषास अनन्त, इंन्द्रियांतीत आणि सूक्ष्म बुद्धीने ग्रहण करण्यास योग्य अशा सुखाचा अनुभव येत असतो. अशा वास्तविक सुखात स्थित झाल्यानंतर तो ध्यानयोगी पुन्हा' कधीहि आपल्या स्वरूपापासून विचलित होत नाही. ॥ २१ ॥

**तो कोणत्या कारणामुळे विचलित होत नाही ?**

तो जो लाभ (सुख) प्राप्त करीत असतो. त्याच्यापेक्षा दुसरा अधिक लाभ आहे असे तो मानत नाही आणि त्यामध्ये स्थित झाल्यानंतर तो फार मोठ्या दुःखानेसुद्धा विचलित केला जात नाही. कारण की, तो ज्या स्थितीमध्ये स्थित असतो त्या स्थितीमध्ये सुखाची न्यूनता राहत नाही. आणि दुःख तेथे पोहोचूं शकत नाही. ॥ २२ ॥

**अशाप्रकारचे विलक्षण सुख प्राप्त करण्याकरिता काय केले पाहिजे ?**

ज्यात दुःखांच्या संयोगाचाच वियोग आहे म्हणजे ज्यांत संसाराबरोबर सर्वथैव सम्बन्ध विच्छेद आहे. त्यालाच 'योग' ह्या नामाभिधानाने ओळखावे.अशा योगाला चित्तानें खिन्न न होता धैर्यानें निश्चयपूर्वक प्राप्त केले पाहिजे ॥ २३ ॥

**आत्मस्वरूपाच्या ध्यानाने ज्या योगाची (साध्यरूप समतेची) प्राप्ती होत असते. त्याच्या प्राप्तीचा दुसरा एखादा उपाय आहे का ?**

आहे, निर्गुण निराकार रूपाचे ध्यान करणे हा उपाय आहे. संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामनांचा सर्वथैव त्याग करून आणि विवेकयुक्त मनानें इंद्रियसमुदायास सर्व बाजूंनी नियमित करून धैर्ययुक्त अशा बुद्धिद्वारा हळूहळू संसारापासून चित्त शांत करावे आणि सर्व

ठिकाणी परिपूर्ण भरलेल्या परमात्म्यामध्ये मन आणि बुद्धीला स्थिर करून पुन्हा कोणतेही चिन्तन करू नये. ॥ २४-२५ ॥

**जर चिन्तन झाले तर काय करावें ?**

अभ्यास करावा. म्हणजे हे अस्थिर आणि चंचल मन जेथे जेथे जाईल तेथून दूर करून त्याला एक परमात्मस्वरूपातच लावावे. ॥ २६ ॥

**असे केल्यामुळे काय होईल ?**

रजोगुणी वृत्तीपासून रहित ज्याचे मन शांत आहे अशा, पापरहित आणि ब्रह्मस्वरूप योगी पुरुषाला उत्तम (सात्त्विक) सुखाची प्राप्ती होईल. ॥ २७ ॥

**त्यानंतर काय होईल ?**

आपण-आपल्याला परमात्म्यामध्ये लावीत असता त्यापापरहित योगी पुरुषाला सुखपूर्वक ब्रह्मस्वरूप नित्य सुखाची प्राप्ति होईल. ॥ २८ ॥

**येथपर्यंत आपण सगुण साकाराचे, आपल्या स्वरूपाचे आणि निर्गुण निराकाराचे ध्यान करणारांचे वर्णन केले, परन्तु ते या संसाराकडे कोणत्या दृष्टीने पाहत असतात, याचे वर्णन केले नाही, भगवन् ! आपण आता हे सांगा की, स्वस्वरूपाचे ध्यान करणारा ह्या संसाराकडे कोणत्या दृष्टीने पाहत असतो ?**

ध्यानयोगाने ज्याचे अन्तःकरण युक्त झालेले आहे असा योगी आपण-आपल्याला (आत्मस्वरूपाला) सर्व प्राणिमात्रांमध्ये पाहत असतो आणि सर्व प्राणिमात्रांना आपण-आपल्यात (आत्मस्वरूपामध्ये) पाहत असतो. म्हणून तो समदर्शी असतो. ॥ २९ ॥

**जो आपल्या सगुण साकार स्वरूपाचे ध्यान करीत असतो तो ह्या संसाराकडे कोणत्या दृष्टीने पाहत असतो ?**

तो सर्व ठिकाणी मलाच पाहत असतो आणि सर्वांना माझ्यामध्येच पाहत असतो. म्हणून त्याच्यासमोर मी अदृश्य होत नाही आणि तो

माझ्यासमोर अदृश्य होत नाही ॥ ३० ॥

**आपण आणि तो योगी—दोघेहि एक दुसऱ्याकरिता अदृश्य का होत नाहीत ?**

तो सम्पूर्ण प्राणिमात्रांमध्ये स्थित असलेल्या माझ्याबरोबर एक होऊन माझे भजन करीत असतो. म्हणून तो सर्वांबरोबर यथोचित वागणूक ठेऊन-सुद्धा सतत माझ्यामध्येच स्थित राहत असतो. मग आम्ही दोघेहि एक दुसऱ्याकरिता अदृश्य कसे होऊं शकतो ? होऊच शकत नाही. ॥ ३१ ॥

**जो आपल्या निर्गुण निराकार स्वरूपाचे ध्यान करतो तो या संसाराकडे कोणत्या दृष्टीने पाहत असतो ?**

ज्याप्रमाणे अज्ञानी मनुष्य आपल्या शरीराच्या अवयव समुदायामध्ये तसेच त्यांच्या सुखदुःखामध्ये आपणास सम पाहत असतो. त्याचप्रमाणे तो योगी आपल्या शरीराच्या उपमेने सर्व प्राणिमात्रांमध्ये तसेच त्यांच्या सुखदुःखांमध्ये आपणास सम पाहत असतो म्हणून तो योगी सर्वश्रेष्ठ मानला गेलेला आहे. ॥ ३२ ॥

**अर्जुन म्हणाला—आतापर्यंत आपण समतेच्या प्राप्तीकरिता ज्या ध्यानयोगाचे वर्णन केले, मधुसूदना ? मनाच्या चंचल स्वभावामुळे त्या ध्यानयोगामध्ये मन स्थिर राहणे मला मोठे कठीण दिसत आहे. कारण की, श्रीकृष्ण ! मन फारच चंचल, दांडगे, बलवान आणि जिद्दी आहें, त्याचा निग्रह करणे मी वाऱ्याचा निग्रह करण्याप्रमाणे फारच कठीण समजतो. ॥ ३३-३४ ॥**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—अर्जुना तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे.

हे महाबाहो ! वास्तविक हे मन फार चंचल आहे आणि याचा निग्रह करणे फारच कठीण आहे. परन्तु कुन्तीनंदन ! अभ्यास आणि वैराग्य यांच्यामुळे याचा निग्रह केला जाऊ शकतो. म्हणून ज्याची मन आणि इंद्रिये ताब्यात नाहीत, त्याच्याकडून ध्यानयोग सिद्ध होणे कठीण आहे.

परन्तु ज्याचे मन आणि इंद्रियें ही ताब्यात आहेत. त्याच्याकडून ध्यानयोग सिद्ध होऊ शकतो. असे माझे मत आहे. ॥ ३५-३६ ॥

**अर्जुन म्हणाला—भगवान श्रीकृष्णा ! ज्याची साधनामध्ये श्रद्धा आहे परन्तु ज्याचे प्रयत्न शिथिल आहेत. अशा साधकाची अन्तकाळी साधनामध्ये स्थिरबुद्धी राहिली नाही तर तो योगसिद्धी प्राप्त न करतां कोणत्या गतीला जात असतो ? संसाराच्या आश्रयापासून रहित आणि परमात्मप्राप्तीच्या मार्गापासून विचलित झालेला उभयभ्रष्ट साधक छिन्न भिन्न झालेल्या मेघाप्रमाणे नष्ट तर होत नाही ना ? हे श्रीकृष्णा ! हा माझा संशय आहे. माझा हा संशय आपणच पूर्णपणे दूर करू शकता. कारण की, या संशयाला आपल्याशिवाय दुसरा कोणीहि मिटवू शकत नाही. ॥ ३७—३९ ॥**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले की, हे पार्था ! त्याचा विनाश या लोकी आणि परलोकीसुद्धा होत नाही. कारण की, अरे बाबा ! कल्याणकारी कर्म करणारा कोणीही साधक दुर्गतीला जात नाहीं. ॥ ४० ॥

**तो दुर्गतीला जात नाही, तर मग कोठे जातो ?**

ज्या साधकाच्या मनामध्यें सांसारिक सुखाची काही इच्छा राहिलेली असते, असा योगभ्रष्ट साधक पुण्यकर्म करणाऱ्यांच्या लोकामध्ये (स्वर्ग इत्यादी उच्च लोकामध्ये) जात असतो आणि तेथे पुष्कळ वर्षापर्यंत राहून मृत्युलोकामध्ये शुद्ध शास्त्राचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरी जन्म घेत असतो. परन्तु ज्या साधकाच्या मनामध्ये सांसारिक सुखाची इच्छा नाही आणि अन्तकाळी काही विशेष कारणामुळे योगभ्रष्ट होत असतो. तो स्वर्गादि लोकामध्ये न जाता सरळ तत्त्वज्ञानी योग्यांच्या कुळात जन्म घेत असतो. अशाप्रकारचा जन्म या लोकी फारच दुर्लभ आहे. ॥ ४१-४२ ॥

**तत्त्वज्ञानी योग्यांच्या कुळांत जन्म घेतल्यानंतर काय होते ?**

हे कुरुनंदन ! तेथे त्याला पूर्वजन्मकृत सर्व साधनसामुग्री अनायासेच

प्राप्त होते त्यांमुळे तो साधनेच्या सिद्धीकरिता पुन्हां तत्परतापूर्वक प्रयत्न करीत असतो. ॥ ४३ ॥

**आपण तत्त्वज्ञ योग्यांच्या कुळात जन्म घेणारांची गोष्ट तर सांगितली आता हे सांगा की, शुद्ध श्रीमंतांच्या घरी जन्म घेणाराचे काय होत असते ?**

तो योगभ्रष्ट भोगांकडे आकृष्ट होऊनसुद्धा पूर्वजन्मी केलेल्या अभ्यासामुळे (साधनेमुळे) परमात्म्याकडे ओढला जात असतो.

**पूर्वाभ्यासात कोणती ताकत आहे, ज्यामुळे तो साधनात बळाने ओढला जातो ?**

अरे भैया ! जेव्हा योगाचा जिज्ञासु अभ्यासकसुद्धा वेदांमध्ये सांगितलेल्या सकाम कर्माचे उल्लंघन करून जात असतो तर मग जो योगभ्रष्ट आहे. योगमार्गास लागलेला आहे. त्याच्याबाबत सांगण्यासारखे काय आहे ! ॥ ४४ ॥

**परमात्म्याकडे ओढले गेल्यानंतर काय होत असते ?**

तो मोठ्या तत्परतेने साधनमार्गाला लागत असतो आणि सर्व पापांपासून मुक्त होऊन अनेक जन्मांपासून सिद्ध झालेला तो साधक श्रेष्ठ गतीला म्हणजेच परमात्म्याला प्राप्त होत असतो ॥ ४५ ॥

**जो योगी परम गतीला प्राप्त होत असतो त्याची महिमा काय आहे ?**

तो योगी सकामभावानें कर्म करणाऱ्या तपस्वीं, ज्ञानीं आणि कर्मीं यांच्यापेक्षाही श्रेष्ठ आहे. असे माझे मत आहे. म्हणून अर्जुना ! तूसुद्धा योगी हो. ॥ ४६ ॥

**योगी पुरुषांमध्येसुद्धा श्रेष्ठ कोण आहे ?**

जो माझ्या ठिकाणी तल्लीन झालेल्या अन्तःकरणाने, श्रद्धा प्रेमपूर्वक माझे भजन करीत असतो. तो माझा भक्त सर्व योग्यांमध्ये श्रेष्ठ आहे. ॥ ४७ ॥

═══ ★ ═══

॥ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय सातवा

**ज्याला आपण सर्वश्रेष्ठ योगी मानता, तसा मीसुद्धा होऊ शकतो का ?**

जरूर होऊ शकतोस.

**कशाप्रकारे ?**

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, पार्थ !, तू माझ्यामध्येच ज्याचे मन आसक्त झाले आहे असा होऊन आणि माझाच आश्रय घेऊन माझे भजन करीत तू निःसंशयपणे माझ्या समग्र रूपास ओळखू शकशील. तू ज्याप्रकारे माझ्या समग्ररूपास जाणशील, ते माझ्याकडून ऐक. ते समग्ररूप जाणण्याकरिता मी तुला संम्पूर्ण विज्ञानासह ज्ञान सांगेन, ज्याला जाणल्यानंतर तुझ्याकरिता ह्या मनुष्यलोकामध्ये काहीहि जाणून घेण्याचे शिल्लक राहणार नाही. ॥ १-२ ॥

**जर अशी गोष्ट आहे, तर सर्व मानव आपल्या समग्ररूपाला जाणून का घेत नाहीत ?**

या विषयाकडे स्वतःप्रवृत्ती फारच कमी लोकांची आहे. हजारो मनुष्यांपैकी कोणी एखादा मनुष्य स्वकल्याणकरिता प्रयत्न करीत असतो. त्या प्रयत्न करण्याऱ्या साधकांमध्ये (सिद्धामध्ये) सुद्धां कोणी एखाद्यच माझ्या समग्ररूपास यथार्थपणे ओळखू शकतो. ॥ ३ ॥

**आपले ते समग्ररूप कशाप्रकारचे आहे ?**

हे महाबाहो अर्जुना ! पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धी, आणि अहंकार या आठ प्रकारच्या भेदाने युक्त अशी माझी अपरा (जड) प्रकृती आहे, यापेक्षा सम्पूर्ण वेगळी माझी जीवरूपा (चेतन) प्रकृती आहे, जिने अहंता आणि ममतेनें या जगताला धारण करून ठेवलेले

आहे. अपरा आणि परा या दोन्ही प्रकृतीच्या संयोगापासूनच सर्व प्राणी उत्पन्न होत असतात.

**हे भगवन् ! यांचे सुद्धा मूळ कारण कोण आहे ?**

मीच सर्व जगताचे मूळ कारण आहे. कारण की, हे सर्व जगत् माझ्यापासूनच उत्पन्न होत असते आणि माझ्यामध्येच लीन होत असते. हे धनंजया ! माझ्याशिवाय या जगताचे दुसरे कोणी किंचिन्मात्रसुद्धा कारण नाही. ज्याप्रमाणे सुतापासून बनविलेले मणी सूताच्याच दोऱ्यात ओवले तर त्या माळेमध्ये सर्व सूतच असते, त्याचप्रमाणें सर्व जगतामध्ये मीच मी आहे. ॥ ४—७ ॥

**हे भगवंता ! परन्तु मी ह्या गोष्टीला कसे समजू ?**

हे कुन्तीनन्दन ! पाण्यामध्ये रस मी आहे, सूर्य आणि चंद्र यामध्ये प्रकाश मी आहे, सर्व वेदांमध्ये ओंकार (प्रणव) मी आहे, आकाशामध्ये शब्द मी आहे, मनुष्यामध्ये पुरुषार्थ मी आहे, पृथ्वीमध्ये पवित्र गंध मी आहे, अग्नीमध्ये तेज मी आहे, सर्व प्राणिमात्रांमध्ये जीवनशक्ती मी आहे, तपस्व्यांमध्यें तप मी आहे. पार्थ ! सर्व प्राणिमात्रांचे अनादी बीज मलाच जाण. बुद्धिमान लोकांची बुद्धी आणि तेजस्वी लोकांचे तेज (प्रभाव) मी आहे. भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! बलवान लोकांचे कामना आणि आसक्तिरहित (सात्त्विक) बल मी आहे. मनुष्यांतील धर्मयुक्त काम मी आहे. अजून काय सांगू, जेवढेहि सात्त्विक, राजस आणि तामस भाव आहेत, ते सर्व माझ्यापासूनच होतात असे समज,परन्तु मी त्यांच्यामध्ये आणि ते माझ्यामध्ये नसतात म्हणजे मी त्यांच्यापासून सर्वथा अतीत आणि निर्लिप्त असतो. ॥ ८—१२ ॥

**जर अशी गोष्ट आहे तर सर्व लोक तुम्हाला असे का जाणत नाहीत ?**

ते सत्त्व, रज आणि तम या तीन्ही गुणांनी मोहित झालेले असतात. अर्थात् संसारातच रममाण होत असतात. म्हणून ते या तीन्ही गुणांनी अतीत आणि अविनाशी अशा मला जाणत नाहीत. ॥ १३ ॥

**तर मग आपणास कोण जाणतात ?**

या तीन्हीं गुणांनी युक्त अशी माझी माया पार करणे फारच कठीण आहे जे या मायेपासून विमुख होऊन केवळ मलाच शरण येतात, ते माझ्या कृपेने ही माया तरून जातात म्हणजे मला जाणतात. ॥ १४ ॥

**जर अशी गोष्ट आहे तर मग सर्व आपणाला शरण का येत नाहीत ?**

जे आसुर भावाचा आश्रय घेणारे आहेत आणि मायेमुळे ज्यांचे ज्ञान (विवेक) लुप्त झालेले आहे, असें मनुष्यांतील नराधम म्हणने पाप कर्म करणारे मूर्ख लोक मला शरण येत नाहीत. ॥ १५ ॥

**हे भगवन् ! तर मग आपणाला कोण शरण येतात ?**

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! अर्थार्थी, आर्त, जिज्ञासु आणि ज्ञानी (प्रेमी), या चार प्रकारचे सुकृती (पुण्यवान) भक्त माझे भजन करतात म्हणजे मला शरण येतात ॥ १६ ॥

**ह्या चारपैकी श्रेष्ठ कोण आहे ?**

ह्या चारही भक्तांमध्ये भावाने भक्ती करणारा ज्ञानी (प्रेमी) भक्त श्रेष्ठ आहे, कारण की, त्याचे चित्त सतत मझ्यामध्येच स्थिर झालेले असते. म्हणून मी त्याला आणि तो मला फार प्रिय असतो. ॥ १७ ॥

**दूसरे भक्त श्रेष्ठ नाहीत का ?**

ते सर्व उदार आहेत, श्रेष्ठ आहेत.

**मग प्रेमीभक्तामध्ये काय विशेषता झाली ?**

प्रेमी भक्त तर माझा आत्माच (स्वरूप) आहे असे माझे मत आहे. कारण की, ज्याच्यापेक्षां श्रेष्ठ दुसरी कोणतीहि गति नाही अशा माझ्यामध्येच त्यांचे चित्त लागलेले आहे आणि माझ्यामध्येच त्यांची दृढ आस्था आहे. तात्पर्य असे आहे की, अर्थार्थी मध्ये धनाचीसुद्धा इच्छा आहे, आर्त भक्तामध्ये दुःख दूर करण्याचीसुद्धा इच्छा आहे आणि जिज्ञासु भक्तामध्ये तत्त्व जाणण्याचीसुद्धा इच्छा आहे परन्तु ज्ञानी भक्तामध्ये तर कोणत्याही प्रकारची कोणतीही इच्छा नसते. ॥ १८ ॥

**ज्ञानी म्हणजे प्रेमी भक्ताची एवढी महती का आहे ?**

पुष्कळ जन्मांच्या शेवटी प्राप्त होणाऱ्या ह्या मनुष्य जन्मात मला शरण येऊन जो ज्ञानी 'सर्व काही वासुदेवच (परमात्माच) आहे' असा अनुभव करत असतो, तो महात्मा जगतामध्ये फारच दुर्लभ आहे. ॥ १९ ॥

**असा प्रेमी भक्त न होण्याचे कारण काय आहे ?**

वेगळ्या-वेगळ्या कामनांमुळे ज्यांचे 'सर्व काही वासुदेवच आहे' अशाप्रकारचे ज्ञान झाकलेले आहे, अशाप्रकारे आपल्या स्वभावाच्या अधीन होऊन ते मानव मला शरण न येता कामनेच्या पूर्णतेकरिता अनेक उपाय आणि नियमानुसार दुसऱ्या देवतांना शरण जातात म्हणजे त्या देवतांच्या भक्तीमध्ये लागतात. ॥ २० ॥

**त्यांना तुम्ही तुमच्याकडे का आकर्षीत करीत नाहीत ?**

मी मानवांना दिलेल्या स्वतंत्रतेचे हरण करीत नाही, उलट ज्या मनुष्याला ज्या-ज्या देवतेची पूजा करणे आवडते. त्या त्या देवतेकडे मी त्याची श्रद्धा वृद्धिंगत करीत असतो आणि तो त्याच श्रद्धेने युक्त होऊन सकामभावाने त्या देवतेची उपासना करीत असतो. परन्तु एक विचित्र गोष्ट आहे की, त्यांना त्या उपासनेद्वारा जो लाभ मिळतो, तो माझ्याकडून सांगितला गेलेलाच मिळत असतो. परन्तु सकामभावनेने देवतेंची उपासना केल्यामुळे त्या अल्पबुद्धी मनुष्याला नाशवान म्हणजे उत्पन्न आणि नष्ट होणारेच फल मिळते, त्यांना माझी प्राप्ती होत नाही. देवतांचे पूजन करणारे अधिकाहून अधिक अशा त्या देवतांच्या पुनरावर्ती लोकामध्ये जाऊ शकतात. परन्तु माझे भक्त मलाच प्राप्त होत असतात. ॥ २१—२३ ॥

**आपले भक्त आपणालाच, प्राप्त होतात. तर मग सर्व लोक आपले भक्त का होत नाहीत ?**

अरे भैय्या ! बुद्धिहीन मानव माझ्या सर्वश्रेष्ठ अविनाशी परमस्वरूपास न ओळखतां मज अव्यक्त परमात्म्याला जन्मणारा व मरणारा मानवच समजतात. मग ते माझे भक्त कसे होऊ शकतील ? ॥ २४ ॥

**ते आपल्या परमस्वरूपास ओळखत नसेनात का, पण आपण त्याच्यासमोर आपल्या खऱ्या स्वरूपामध्ये प्रकट का होत नाहीत ?**

नाही, भैय्या ! जर ते मूर्ख लोक मला अजन्मा आणि अविनाशी मानत नाहीत, तर योगमायेने चांगल्या प्रकारे आच्छादित झालेलो मी त्यांच्यासमोर माझ्या ख-या स्वरूपांत प्रगट होत नाही. ॥ २५ ॥

**त्या योगमायेचा पडदा आपल्यासमोर राहत नाही का ?**

नाही, अर्जुना ! मी तर भूत, भविष्य आणि वर्तमान काळात होणाऱ्या सर्व प्राणिमात्रांना जाणता असतो, परन्तु ते मायेमुळे मोहित झालेले जीव मला जाणत नाहीत. ॥ २६ ॥

**आपणास न ओळखण्यामध्ये मुख्य कारण काय आहे ?**

हे भरतवंशातील अर्जुना ! मला न ओळखण्यात मुख्य कारण हे आहे की, राग आणि द्वेष यांच्यापासून उत्पन्न होणारा हा द्वन्द्वमोह. हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना ! या द्वन्द्वमोहाने मोहित झालेले सर्व प्राणी जगतामध्ये जन्म-मरणास प्राप्त होत राहतात. ॥ २७ ॥

**तर सर्व प्राणी द्वन्द्वमोहानें मोहित झालेले असतात काय ?**

नाही, ज्या पुण्यकर्म करणाऱ्या मनुष्यांचे पाप नष्ट झालेले आहे. ते द्वन्द्वमोहापासून रहित होतात आणि दृढव्रती होऊन माझे भजन (भक्ती) करतात. ॥ २८ ॥

**दृढव्रत होऊन आपल्या भजनात लागल्याने काय होते ?**

जे वृद्धपणा आणि मरण इत्यादि दुःखापासून मुक्ति मिळविण्याकरितां केवळ माझाच आश्रय घेऊन प्रयत्न करीत असतात. ते त्या ब्रह्माला संपूर्ण अध्यात्माला (जीवसमुदायाला) आणि सर्व कर्मांना जाणतात. तसेच ते अधिभूत, अधिदैव, आणि अधियज्ञासहित मला म्हणजेच माझ्या समग्र स्वरूपाला ('सर्व काही वासुदेवच आहे' ह्या रूपाला) ओळखत असतात, एवढेच नाहीं, तर ते अनन्य भक्त मरणाच्या वेळी मलाच प्राप्त होत असतात. ॥ २९-३० ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय आठवा

**अर्जुन म्हणाला, पुरुषोत्तमा ! आता आपण आपल्या आश्रयाला आलेल्या लोकांकडून आपल्या ब्रह्म, अध्यात्म इत्यादी समग्ररूपाला ओळखण्याची गोष्ट सांगितली, आता मी हे विचारू इच्छितो की, ते ब्रह्म काय आहे ?**

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले—त्या परम अक्षर अर्थात् निर्गुण-निराकार परमात्म्याला ब्रह्म म्हणतात.

**ते अध्यात्म काय आहे ?**

जीवांच्या सत्तेला (अस्तित्वाला) अध्यात्म म्हणतात.

**ते कर्म काय आहे ?**

महाप्रलयाच्या वेळी आपल्या कर्मासह माझ्यामध्ये लीन झालेल्या जीवांना महासर्गाच्या आरंभी कर्मफल-भोगाकरिता आपल्यामधूनच प्रगट करणें म्हणजे देहांबरोबर विशेष संबंध करून देणे हेच त्यागरूप कर्म होय.

**हे भगवंत ! अधिभूत कशाला म्हटले आहे ?**

हे देहधाऱ्यांतील श्रेष्ठ अर्जुना ! नाश पावणारे सर्व पदार्थ अधिभूत होय.

**अधिदैव कशाला म्हटले जाते ?**

सृष्टीच्या आरंभी सर्वात प्रथम प्रगट होणारे हिरण्यगर्भ. ब्रह्मदेव अधिदैव आहेत.

**या देहात अधियज्ञ कोण आहे ?**

या मानवशरीरात अन्तर्यामीरूपाने मीच अधियज्ञ आहे.

**मधुसूदना ! ज्यांनी आपले अन्त:करण वश करून घेतलेले आहे. अशा मानवांकडून मरणकाळी आपण कसे जाणण्यात येता ?**

हे अर्जुना ! अन्तकाळाविषयी मी आपला नियम सांगतो. जो मानव मरणसमयी माझे स्मरण करीत देह सोडतो. तो मलाच प्राप्त होतो यांत संशय नाही. ॥ १—५ ॥

**मरणसमयी आपले स्मरण केले तर आपणास प्राप्त होईल परन्तु जर आपले स्मरण केले नाही तर ?**

हे कुन्तीनंदना ! मनुष्य मरणसमयी ज्या भावनेचे स्मरण करीत शरीर सोडतो. तो त्याच मरणसमयीच्या भावनेनें सतत भावित झालेला त्याच भावनेला प्राप्त होतो. ॥ ६ ॥

**तर मग मरणसमयी आपल्या स्मरणाकरीता काय केले पाहिजे ?**

तू तुझे मन आणि बुद्धी मला अर्पण करून सर्वकाळ माझेच स्मरण करीत रहा आणि प्राप्त कर्तव्यकर्मसुद्धा कर.

**त्यापासून काय होईल ?**

तू नि:संशयपणे मलाच प्राप्त होशील ॥ ७ ॥

**हे भगवंता आपल्या कोणत्या स्वरूपाच्या स्मरणाने नियतात्मा मनुष्य आपल्याला प्राप्त करतो ?**

माझी सगुण-निराकार, निर्गुण-निराकार आणि सगुण-साकार अशी तीन रूपे आहेत. यापैकी प्रथम मी सगुण निराकार रूपाच्या चिंतनाचा प्रकार सांगतो, अर्जुना जो मानव अभ्यासयोगाने युक्त होऊन अनन्यचित्ताने परम दिव्य पुरुषाचे म्हणजे माझ्या सगुण निराकार स्वरूपाचे चिंतन करीत शरीर सोडतो. तो माझ्या त्याच सगुण निराकार स्वरूपाला प्राप्त होतो. ॥ ८ ॥

**भगवन्ता ! ते स्वरूप कशाप्रकारचे आहे ?**

ते सर्वज्ञ आहे, सर्वांचे आदी आहे, सर्वांवर शासन करणारे आहे,

सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म आहे, सर्वांचे भरण पोषण करणारे आहे, अचिन्त्य आहे, आणि अज्ञानरूपी अंधकारापासून रहित तसेच सूर्याप्रमाणे प्रकाश-स्वरूप आहे. अशा स्वरूपाचे जो चिंतन करतो तो भक्तियुक्त मनुष्य मरणसमयी योगबलाद्वारे अचल मनानें आपल्या प्राणाला् भुवयांच्या मध्यभागी चांगल्या प्रकारे स्थापन करून शरीर सोडल्यानंतर त्या परम दिव्य पुरुषाला प्राप्त होतो. ॥ ९-१० ॥

**मी आपल्या सगुण निराकार स्वरूपाच्या चिंतनाने आपली प्राप्ती ऐकली आता निर्गुण निराकार स्वरूपाच्या चिंतनाने मनुष्य आपली प्राप्ती कशी करतो ?**

वेदार्थ जाणणारे लोक ज्याला अक्षर (अविनाशी) म्हणतात,ज्यांची आसक्ती गेलेली आहे असे विरक्त यती ज्याला प्राप्त करतात आणि ज्याला प्राप्त करण्याच्या इच्छेने ब्रह्मचारी लोक ब्रह्मचर्याचे पालन करतात, त्यापदाच्या प्राप्तीची गोष्ट मी संक्षिप्तरूपाने सांगेन. जो साधक मरणसमयी सर्व इंद्रियांना ताब्यात ठेवून मनाला हृदयात स्थापन करून आणि प्राणवायूला सुषुम्नानाडीद्वारा मस्तकात स्थापन करून योगधारणेमध्ये प्रवृत्त झालेला' ॐ' ह्या एक अक्षररूप ब्रह्माचे उच्चारण आणि माझ्या निर्गुण निराकार स्वरूपाचे चिंतन करीत शरीर सोडतो तो परमगतीला प्राप्त होतो. ॥ ११—१३ ॥

**मी आपल्या निर्गुण निराकार स्वरूपाच्या चिंतनाने आपल्या प्राप्तिची गोष्ट आता ऐकली आता सगुण साकार स्वरूपच्या चिंतनाने मनुष्य कसे प्राप्त करतो ते सांग ?**

हे पार्था ! जो मनुष्य अनन्यचित्ताने सतत माझेच चिंतन करीत असतो माझ्याकडे ज्याचे चित्त लागलेले आहे अशा योगी पुरुषास मी प्राप्त होण्यास सुलभ आहे. म्हणजेच त्याला मी सुलभतेने प्राप्त होतो. ॥ १४ ॥

**हे भगवन् ! आपली प्राप्ती झाल्यामुळे काय होते ?**

जे महात्मे लोक माझ्या परम प्रेमाने युक्त होऊन मला प्राप्त करतात, ते क्षणभंगुर आणि दुःखांचे घररूप असणाऱ्या पुनर्जन्मास प्राप्त होत नाहीत. ॥ १५ ॥

**तर मग पुजर्नन्म कोणाचा होतो ?**

अर्जुना ! ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोक पुनर्जन्म घेणारे आहेत. म्हणून त्या लोकामध्ये गेल्यानंतर पुन्हा फिरून यावेच लागते अर्थात् पुन्हा जन्म घ्यावाच लागतो. परंतु हे कुन्तीपुत्रा ! माझी प्राप्ती झाल्यानंतर पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. ॥ १६ ॥

**ते लोक पुनरावर्ती का आहेत ?**

कालाने बद्ध असल्यामुळे.

**तो काल काय आहे ?**

दिवस आणि रात्र यांच्या तत्त्वाला ओळखणारे पुरुष हे जाणत असतात की, एक हजार चतुर्युगी * संपल्यानंतर ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो आणि एक हजारच चतुर्युगी संपल्यानंतर ब्रह्मदेवाची एक रात्र होते. ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या सुरूवातीला (ब्रह्मदेव झोपेतून जागा झाल्यानंतर) ब्रह्मदेवाच्या सूक्ष्मशरीरापासून सर्व प्राणी प्रगट होतात आणि ब्रह्मदेवाच्या रात्रीच्या सुरुवातीला (ब्रह्मदेव झोपल्यानंतर) ब्रह्मदेवाच्या सूक्ष्मशरीरामध्ये सर्व प्राणी लीन होतात. ॥ १७-१८ ॥

**हे भगवन्ता ! ते प्राणी पुन्हा पुन्हा का जन्म घेतात आणि मरतात ?**

प्राण्यांचा समुदाय तर तोच राहत असतो, जो पहिल्या कल्पात होता. परंतु केवळ आपल्या राग-द्वेषयुक्त स्वभावाधीन होऊन तो प्राणी समुदाय पुन्हा पुन्हा ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या वेळी उत्पन्न होतो आणि

* त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षांची एक चतुर्युगी होते.

ब्रह्मदेवाच्या रात्रीच्या वेळी लीन होतो ॥ १९ ॥

**त्या अव्यक्तापेक्षाही (ब्रह्मदेवाच्या सूक्ष्मशरीरापेक्षाही) ज्याचा कधीही नाश होत नाही; असे दुसरे काही श्रेष्ठ आहे का ?**

आहे. त्या ब्रह्मदेवापेक्षाही श्रेष्ठ एक नित्य निरंतर राहणारा भावरूप असा अव्यक्त परमात्मा आहे. जो सर्व प्राणीमात्रांचा नाश झाल्यानंतरसुद्धा नाश पावत नाही, त्याला अव्यक्त, अक्षर आणि परमगती म्हणतात. तसेच ज्याला प्राप्त झाल्यानंतर जीव पुन्हां जगतामध्ये येत नाहीत तेच माझे परमधाम (स्वरूप) आहे. ॥ २०-२१ ॥

**त्या परमधामाची प्राप्ती कशी होईल ?**

हे पार्था ! ज्याच्या अंतर्गत सर्व जगत् आहे आणि ज्याने सर्व जगत् व्यापले आहे, असा तो परमपुरुष परमात्मा अनन्यभक्तीनें प्राप्त होतो. ॥ २२ ॥

**अन्याचा (संसाराचा) संबंध न ठेवण्यामुळे आणि संबंध ठेवण्यामुळे काय होते ?**

हे अर्जुना ! अन्याचा संबंध न ठेवणारे प्राणी ज्या मार्गाने गेले पुन्हा फिरून जगतात येत नाहीत. आणि अन्याचा संबंध ठेवणारे प्राणी ज्या मार्गाने गेले पुन्हां फिरून जगतांत येतात. त्या दोन्ही मार्गांना मी सांगतो. ॥ २३ ॥

**भगवन्ता ! ते दोन्ही मार्ग कोणते आहेत ?**

ज्या मार्गामध्ये प्रकाशस्वरूप अग्नी, दिवस, शुक्लपक्ष आणि सहा महिन्याच्या उत्तरायणाची अधिपती देवता आहे, शरीर सोडून त्या मार्गाने गेलेले ब्रह्मवेत्ते लोक ब्रह्माला प्राप्त होतात अर्थात् पुन्हा फिरून येत नाहीत आणि ज्या मार्गामध्यें धूम्र, रात्र, कृष्णपक्ष आणि सहा महिन्यांच्या दक्षिणायनाची अधिपती देवता आहे, शरीर सोडून त्या मार्गाने

गेलेले सकाम मनुष्य स्वर्गादी उच्च लोकांचे सुख भोगून पुन्हा फिरून येतात. ॥ २४-२५ ॥

**हे दोन्ही मार्ग केव्हापासून सुरू झालेले आहेत ?**

प्राण्यांचे हे दोन्ही शुक्ल आणि कृष्णमार्ग अनादी आहेत. त्यापैकी शुक्ल मार्गाने जाणारास फिरून यावे लागत नाही. आणि कृष्ण मार्गाने जाणारास पुन्हा फिरून यावे लागते. ॥ २६ ॥

**हे भगवन् ! पुन्हा फिरून यावे लागणार नाही, याकरिता काय करावे ?**

हे अर्जुना ! या दोन्ही मार्गांच्या परिणामाला जाणल्यामुळे कोणीही योगी संसारात मोहीत होत नाही. म्हणून हे अर्जुना ! तू सर्वकाळी योगयुक्त हो म्हणजे संसारात सतत निर्लिप्त, निर्विकार रहा. ॥ २७ ॥

**हे भगवन् ! योगी होण्यामुळे काय होईल ?**

वेदात, यज्ञात, तपात तसेच दानात जे जे पुण्यफल सांगितले गेलेले आहे. योगी त्या सर्व पुण्यफलांचे अतिक्रमण करून मूळस्थान अशा परमात्म्याला प्राप्त होतो. ॥ २८ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय नववा

**मी मध्येच प्रश्न विचारल्यानंतर आपण जे सांगितले ते मी ऐकले. भगवंता! मी प्रश्न करण्याअगोदर आपण काय सांगू इच्छित होता ?**

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले—मी अगोदर विज्ञानासह ज्ञानाची गोष्ट सांगत होतो. ते अतिशय गुह्य असे विज्ञानासह ज्ञान दोषदृष्टिरहित असणाऱ्या तुला मी पुन्हा सांगेन जे जाणल्यामुळे तूं जन्ममरणरूप अशा संसारापासून मुक्त होशील. ॥ १ ॥

**ते विज्ञानासह ज्ञान तर फार कठीण असेल ?**

नाही. ते विज्ञानासह ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्वगुह्यांचा राजा, अत्यंत पवित्र, अत्यंत उत्तम, प्रत्यक्ष फळ देणारे, धर्ममय आणि अविनाशी आहे. तसेच संपादन करण्यास फारच सुलभ आहे. ॥ २ ॥

**अशा सुलभ विद्येला सर्वच्या सर्व लोक प्राप्त का करून घेत नाहीत ?**

हे परतंपा! माणसे ह्या ज्ञान-विज्ञानरूप धर्मावर विश्वास ठेवत नाहीत. म्हणून ते मला प्राप्त न होता मरणरूपी संसाराच्या मार्गामध्ये फिरत राहतात अर्थात् पुन्हा पुन्हा जन्म घेतात आणि मरतात. ॥ ३ ॥

**भगवन्ता ! तो ज्ञान विज्ञानरूप धर्म (विद्या) काय आहे ?**

मी अव्यक्तरूपानें सर्व प्राणिमात्रांमध्ये आहो आणि सर्व प्राणिमात्र माझ्यामध्ये आहेतआणि मी सर्व प्राणिमात्रांत नाही व ते सर्व प्राणी माझ्यात नाहीत म्हणजे जेथे प्राणिमात्रांची स्वतंत्र सत्ता मानली जाईल, तेथे

तर सर्व प्राणिमात्रांमध्ये मी आहे आणि सर्व प्राणी माझ्यामध्ये आहेत, परन्तु जेथे प्राणिमात्रांची स्वतंत्र सत्ता मानली जात नाही, तेथे मी प्राणिमात्रामध्ये नाही आणि प्राणिमात्र माझ्यामध्ये नाहीत. परन्तु सर्व काही मीच मी आहे.

**पण ह्या संसाराचा उत्पादक आणि आधार तर कोणीतरी असेलच ?**

अरे भैय्या ! आहे तर मीच, परन्तु माझे स्वरूप सर्व प्राणिमात्राला उत्पन्न करणारे, सर्वांना धारण करणारे आणि त्यांचे भरण पोषण करणारे असूनसुद्धा त्या प्राणिमात्रांमध्ये स्थित नाही, त्यांच्यापासून सर्वथैव निर्लिप्त आहे. माझ्या या ईश्वरसंबंधी योगाला (सामर्थ्याला) तू जाणून घे. ॥ ४-५ ॥

**तर मग ते प्राणी आपल्यामध्ये कशाप्रकारे स्थित आहेत ?**

ज्याप्रकारे सर्व ठिकाणी विचरण करणारा महान वायू सतत आकाशात स्थित असतो. त्याचप्रकारे हे सर्व प्राणी माझ्यामध्येच स्थित राहतात असे समज. ॥ ६ ॥

**मग तर ते प्राणी मुक्त होत असतील ?**

नाही, अर्जुना ! प्रकृतीबरोबर संबंध ठेवणारे ते प्राणी महाप्रलयाच्या वेळी माझ्या प्रकृतीला प्राप्त होतात. आणि महासर्गाच्या आरंभी मी पुन्हां त्यांची उत्पत्ती करतो. ॥ ७ ॥

**भगवंता ! आपण त्यांची उत्पत्ती कोठपर्यंत करीत राहता ?**

जोपर्यंत ते आपल्या प्रकृतीच्या (स्वभावाच्या) अधीन राहतात तोपर्यंत मी माझ्या प्रकृतीला स्वाधीन करून त्यांची पुन्हा पुन्हा उत्पत्ती करीत राहतो ॥ ८ ॥

**भगवन्ता ! जेव्हा आपण त्यांची पुन्हा पुन्हा उत्पत्ती करीत असता, तेव्हा आपला त्यांच्या उत्पत्तिरूप कर्माबरोबर संबंध राहत असणार ?**

नाहीं, हे धनंजया ! मी त्यांच्या उत्पत्तीरूप कर्मामध्यें आसक्तिरहित तसेच उदासीनाप्रमाणे सर्वथैव निर्लिप्त राहत असतो. त्यामुळे ते कर्म मला बद्ध करीत नाही. ॥ ९ ॥

**तरमग आपण सृष्टीची रचना कोणत्या प्रकारे करतां ?**

वास्तविक तर प्रकृतीच माझ्या अध्यक्षतेमध्ये अर्थात् माझ्याकडून सत्तास्फूर्ती मिळवून सर्व चर-अचर प्राण्यांची निर्मिती करीत असते हे कुंतीपुत्रा ! माझ्या अध्यक्षत्त्वाच्या निमित्तानेच या जगतामध्ये विविध परिवर्तन होत आहे ॥ १० ॥

**आपल्या शक्तीमुळेच जगतामध्ये सर्व काही होत असते. तरीसुद्धा सर्व लोक आपणांवर श्रद्धा का ठेवत नाहीत ?**

अविवेकी लोक माझ्या सर्व प्राण्यांच्या महान ईश्वररूप अशा परम भावास न ओळखता मला साधारण मनुष्य मानून माझी अवज्ञा करतात. ॥ ११ ॥

**भगवन् ! अविवेकी लोक कशा प्रकारचे असतात ?**

ते अविवेकी लोक आसुरी, राक्षसी आणि मोहिनी प्रकृतीचा आश्रय घेणारे असतात आणि त्यांच्या सर्व आशा, सर्व शुभकर्म, तसेच त्यांचे सर्व ज्ञान व्यर्थ असते म्हणजे खरे फल देणारे नसते. ॥ १२ ॥

**भगवन् ! मग आपणावर श्रद्धा ठेवणारे कोण असतात ?**

हे पार्था ! जे महात्मे लोक मला सर्व प्राण्यांचे आदिकारण आणि अविनाशी मानतात. ते माझ्या दैवी संपत्तीचा आश्रय घेऊन अनन्यभावाने माझे भजन करीत असतात. ॥ १३ ॥

**आपले भजन करणारांचे लक्षण काय असते ?**

सतत माझ्या भजनाला लागलेले ते दृढव्रती लोक भक्तिपूर्वक माझे नामकीर्तन करीत असतात. माझ्या प्राप्तीकरिता तत्परतेने प्रयत्न करीत असतात आणि नमस्कार करून माझी उपासना करीत असतात. ॥ १४ ॥

**भगवन्ता ! आपली उपासना करणारांचे आणखी काही प्रकार आहेत का ?**

आहेत. काही साधक ज्ञानयज्ञाद्वारा अभिन्न भावाने माझी पूजा करीत माझी उपासना करीत असतात आणखी दुसरे काही साधक आपणास पृथक् मानून तसेच या विश्वाला माझे स्वरूप समजून सेव्य-सेवक-भावानें माझी अनेक प्रकारे उपासना करीत असतात. ॥ १५ ॥

**भगवन् ! विश्वाची उपासना आपली उपासना कशी झाली ?**

मीच क्रतु, यज्ञ, स्वधा, औषध, मंत्र, घृत, अग्नी आणि हवनरूप क्रिया आहे. मीच जाणण्यायोग्य, पवित्र, ओंकार, ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेद आहे. ह्या सर्व जगताचा पिता, धाता, माता, पितामह, गती, भर्ता, प्रभू, साक्षी, निवास, आश्रय, सुहृद, उत्पत्ती, प्रलय, स्थान, निधान आणि अविनाशी बीजसुद्धां मीच आहे. अर्जुना !, मीच सूर्यरूपाने ताप देत असतो. पाण्याचे ग्रहण करीत असतो आणि पुन्हा त्या पाण्याचा पाऊसरूपाने वर्षाव करीत असतो. मीच अमृत आणि मृत्यू आहे आणि काय सांगू, सत् आणि असत् (जड व चेतन) सुद्धा मीच आहे. ॥ १६—१९ ॥

**जर विश्वरूपाने सर्व काही आपणच आहात, तरमग आपणास सोडून मानव इतर देवतांची उपासना का करतात ?**

सुखभोगाची इच्छा करणारे मानव तीन्ही वेदांमध्ये सांगितलेल्या यज्ञादी शुभकर्मांच्या अनुष्ठानाद्वारा इन्द्राचे पूजन करून स्वर्गाची याचना करीत असतात. मग सोमरस पिणारे आणि स्वर्गाच्या प्रतिबन्धक पापापासून रहित असे ते मानव पुण्याच्या बळावर विशाल स्वर्गलोकात जातात आणि तेथे देवतांचे दिव्य भोग भोगून पुण्य क्षीण झाल्यावर पुन्हा मृत्युलोकामध्ये येतात. अशाप्रकारे तिन्ही वेदांमध्ये सांगितलेल्या सकाम

कर्माच्या अनुष्ठानाचा आश्रय घेणारे आणि भोगांची इच्छा करणारे मानव पुन्हा पुन्हा जन्मतात आणि मरतात. ॥ २०-२१ ॥

**ही दशा तर सकाम अनुष्ठानांचा आश्रय घेणाऱ्या लोकांची होते परंतु कोणी आपला आश्रय घेईल तर ?**

जे अनन्य होऊन माझे चिन्तन करीत माझी उपासना करीत असतात. त्या निरंतर माझ्या भक्तीमध्ये लागलेल्या भक्तांचा योगक्षेम मी स्वतः वाहत असतो अर्थात् अप्राप्ताची प्राप्ती करून देणे आणि प्राप्ताचे रक्षण करणे हे काम मी स्वतः करीत असतो. ॥ २२ ॥

**परन्तु आपली उपासना न करता कोणी श्रद्धापूर्वक अन्य देवतांची उपासना करील तर ?**

हे कुन्तीनन्दना ! जे मानव श्रद्धापूर्वक अन्य देवतांचे पूजन करतात ते-सुद्धां वस्तुतः (सत्—असत् सर्व काही मीच आहे' या दृष्टीने) माझेच पूजन करतात. परन्तु त्यांच्याकडून केले गेलेले ते पूजन विधिपूर्वक होत नाही. ॥ २३ ॥

**भगवन् ! जर ते पूजन सुद्धा आपलेच आहे. तर मग त्यांचे ते पूजन अविधिपूर्वक का आहे ?**

यज्ञ, दान, तप इत्यादी सर्व शुभकर्मांचा भोक्ता आणि सर्व जगताचा मालक मीच आहे, परन्तु ते मला अशाप्रकारे तत्त्वाने ओळखत नाहीत म्हणून त्यांचे पतन होते, ॥ २४ ॥

**ते पतन कोणते आहे ?**

देवतांचे भक्त देवतांना, पितरांचे भक्त पितरांना आणि भूतप्रेतांचे भक्त भूत प्रेतांना प्राप्त होतात. परन्तु माझे भक्त तर मलाच प्राप्त होतात. ॥ २५ ॥

**ज्या भक्तीमुळें आपले भक्त आपणासच प्राप्त होतात. ती भक्ती तर मोठी कठीण असेल ?**

नाही. ती भक्ती तर मोठी सुलभ आहे. जो भक्त मला प्रेमाने पत्र पुष्प, फळ, पाणी इत्यादी अर्पण करतो त्या माझ्यामध्ये तल्लीन झालेल्या भक्ताकडून भक्तिपूर्वक दिलेल्या उपहाराचे मी स्वतः सेवन करीत असतो. ॥ २६ ॥

**मला काय केले पाहिजे ?**

कुन्तीपुत्रा ! तू जे काही खातो, जे काही यज्ञ करीतो, जे काही दान देतो, जे काही तप करीतो आणि याशिवाय जे काहीही करीतो ते सर्व मला अर्पण कर. ॥ २७ ॥

**भगवन् ! सर्व काही आपणास अर्पण केल्यामुळे काय होईल ?**

तू बन्धनकारक अशा सर्व शुभ-अशुभ कर्मांच्या फळापासून मुक्त होऊन मला प्राप्त होशील. ॥ २८ ॥

**जो सर्व काही आपणास अर्पण करील, त्याला तर आपण बन्धनापासून मुक्त कराल आणि जो सर्व काही आपणास अर्पण न करील तो बन्धनातच राहील. आपणामध्ये एवढा पक्षपात का ?**

हा पक्षपात नाही. मी तर सर्व प्राणिमात्रांमध्ये समान आहे. माझा कोणी द्वेषीही नाही आणि कोणी प्रियही नाही. परन्तु जे प्रेमपूर्वक माझे भजन करतात, ते माझ्यामध्ये आणि मी त्यांच्यामध्ये विशेषरूपाने असतो. ॥ २९ ॥

**कोणी मनुष्य दुराचारी असेल, तर काय तोसुद्धा आपले भजन करू शकतो ? आपला भक्त होऊ शकतो ?**

हो ! जरूर होऊ शकतो, जर कोणी अत्यन्त दुराचारी मनुष्यसुद्धा दुसऱ्यांचा आश्रय सोडून माझे भजन करीत असेल, तर त्याला साधुच मानले पाहिजे, कारण की, त्याने फार चांगला निश्चय केलेला आहे. ॥ ३० ॥

**त्याला केवळ साधूच मानावे काय ?**

नाही, तो तर तात्काळ धर्मात्मा (महान् पवित्र) होतो आणि सतत राहणाऱ्या शान्तीला प्राप्त होतो. कुन्तीनंदना, तू प्रतिज्ञा कर की, माझ्या भक्ताचे कधीही पतन होत नाही. ॥ ३१ ॥

**आपल्या भक्तीचे अधिकारी आणखी कोणी होऊ शकते काय ?**

होय. पार्था ! पापयोनी-चाण्डाळादी तसेच स्त्रिया वैश्य आणि शूद्रसुद्धा माझा आश्रय घेऊन मला प्राप्त होतात. मग जे जन्माने आणि कर्माने पवित्र असे ब्राह्मण आणि क्षत्रिय आहेत. ते माझे भक्त होतील, यात तर सांगण्यासारखे आहेच काय ?

**भगवन् ! मी असा भक्त कसा होऊ ?**

या नाश पावणाऱ्या आणि सुखरहित शरीराला प्राप्त होऊन तू माझे भजन कर ॥ ३२-३३ ॥

**आपले भजन मी कसे करू ?**

तू स्वतः माझाच भक्त हो, माझ्या ठिकाणीच मन ठेवणारा हो, माझीच पूजा करणारा हो आणि मलाच नमस्कार कर. अशाप्रकारे माझ्याबरोबर, मन, बुद्धी आणि इन्द्रियांसहित शरीराला लावून मत्परायण झालेला तू मलाच प्राप्त होशील. ॥ ३४ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय दहावा

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—तू पुन्हा माझे परम वचन * ऐक, जे मी तुझ्या हिताच्या दृष्टीने सांगेन, कारण की, हे अर्जुना ! तू माझ्यामध्ये फार प्रेम ठेवतोस.

**भगवन्ता ! ते परम वचन काय आहे ?**

हे सर्व जगत् माझ्याकडूनच प्रगट केले गेलेले आहे या गोष्टीला पूर्णप्रकारे देवता जाणत नाहीत आणि महर्षीसुद्धा जाणत नाहीत, कारण की, मी सर्वप्रकारे देवता आणि महर्षि यांचे मूळ कारण आहे. ॥ १-२ ॥

**जर सर्वांचे मूळ कारण असणाऱ्यां आपणास देवता आणि महर्षिलोकसुद्धा ओळखत नाहीत, तर मग मानव आपणास कसा ओळखेल. आणि त्याचे कल्याण कसे होईल ?**

जो मनुष्य मला जन्मरहित, अविनाशी आणि सर्व लोकांचा महान ईश्वर समजतो म्हणजेच दृढपूर्वक मानतो. तो मानवांमध्ये ज्ञानवान आहे आणि तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ॥ ३ ॥

**भगवन्ता ! ते आपले परम वचन मी कसे समजावून घेऊ ?**

बुद्धी, ज्ञान, मोहरहित होणे, क्षमा, सत्य, इद्रियांना ताब्यात ठेवणे, मनाला ताब्यात ठेवणे, सुख, दुःख, उत्पन्न होणे, लीन होणे, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश आणि अपयश प्राणि-मात्रांचे हे अनेक प्रकारचे आणि वेगळे वेगळे भाव माझ्यापासूनच

---

* सर्वांचे मूळकारण आपण स्वतः आहोत असे सांगणे हेच भगवंताचे परम वचन आहे.

होतात. केवळ हे भावच नाहीत. जे माझ्यामध्ये श्रद्धाभक्ती ठेवतात आणि त्यांच्याही अगोदर झालेले चार सनकादिक तसेच चौदा मनुसुद्धा माझ्या मनापासून उत्पन्न झालेले आहेत. अर्थात् त्या सर्वांचा उत्पादक आणि शिक्षक मीच आहे. ॥ ४—६ ॥

**बुद्धी, ज्ञानादी आणि महर्षि इत्यादी माझ्यापासूनच उत्पन्न होतात. हे म्हणण्यामध्ये आपले काय तात्पर्य आहे ?**

जो माझ्या ह्या विभूती आणि योगाला* श्रद्धेने दृढपूर्वक मानतो त्याची माझ्यामध्ये अविचल भक्ती होते. यात काही संशय नाही. ॥ ७ ॥

**ते दृढपूर्वक मानणे काय आहे ?**

मी यावत् जगताचे मूळ कारण आहे आणि माझ्यापासूनच सर्व जगत् कर्मप्रवृत्त झालेले आहे. अशाप्रकारे मला दृढपूर्वक मानून माझ्यामध्येच श्रद्धा प्रेम ठेवणारे बुद्धिमान भक्त माझेच भजन करतात. ॥ ८ ॥

**भगवन्. ! त्यांच्या भजनाचा प्रकार कोणता आहे ?**

माझ्यामध्ये मन ठेवणारे, माझ्यामध्येच प्राणांना अर्पण करणारे भक्तजन आपापसात माझे गुण, प्रभाव इत्यादी समजावून देतात आणि त्यांचे कथन करीत सदा सर्वकाळ सन्तुष्ट राहतात आणि माझ्यामध्येच प्रेम करीत असतात. ॥ ९ ॥

**अशा भक्तांकरिता आपण काय करता ?**

अशाप्रकारे सदासर्वकाळ भक्तीला लागलेल्या आणि प्रेमपूर्वक माझे भजन करणाऱ्या भक्तांना मीच स्वतः तो बुद्धियोग (समता) देत असतो. ज्यामुळे ते मला प्राप्त करीतात. ॥ १० ॥

---

* भगवंताच्या सामर्थ्याचे नांव 'योग' आहे आणि ह्या योगापासून प्रगट होणारे जेवढे ऐश्वर्य आहे. त्याचे नांव 'विभूती' आहे.

**याच्याशिवाय आपण दुसरे काही करीत असता काय ?**

होय, त्या भक्तांवर कृपा करण्याकरिता त्यांच्या स्वरूपात स्थिर झालेलो मी त्यांच्या अज्ञानरूपी अन्धकाराला दैदिप्यमान अशा ज्ञानरूपी-दिव्याद्वारा सर्वथैव नष्ट करतो.॥ ११ ॥

अर्जुन म्हणाला—भगवान श्रीकृष्णा ! भक्तांवरील आपली अलौकिक, विलक्षण कृपेची गोष्ट ऐकून मी गद्‌गद होत आहे. हे प्रभो ! निर्गुण निराकार ब्रह्म, सर्वांचे परम स्थान आणि महान पवित्र आपणच आहात. आपण शाश्वत, दिव्य पुरुष, आदिदेव, जन्मरहित, व्यापक आहात. असे सर्वच्या सर्व ऋषी, देवर्षि नारद, असित, देवल तसेच व्यास सांगतात आणि स्वतः आपणसुद्धा मला सांगत आहात.॥ १२-१३ ॥

**अर्जुना ! मी जे सांगत आहे, त्याच्यावर तुझा विश्वास आहे का ?**

होय. केशवा ! आपण जे काही मला सांगत आहात ते सर्व मी सत्य मानतो. भगवन् ! आपल्या प्रगट स्वरूपाला दिव्यशक्तिवाले देव जाणत नाहीत आणि विलक्षण माया शक्तिवाले दानवलोकसुद्धा जाणत नाहीत.॥ १४ ॥

**देवसुद्धा जाणत नाहीत, तर मग कोण जाणतात ?**

भूतांना उत्पन्न करणाऱ्या भगवन्ता ! भूतांच्या नियामका ! देवांच्याही देवा ! जगत्पालका ! पुरुषोत्तमा ! तू स्वतःच स्वतःकडून स्वतःला ओळखतोस. म्हणून आपण ज्या विभूतींनी सर्व जगताला व्यापून स्थित आहात त्या आपल्या सर्व दिव्य विभूती पूर्णपणे सांगण्यास आपणच समर्थ आहात.॥ १५-१६ ॥

**त्या सर्व विभूती ऐकून काय करशील ?**

हे योगिन् ! सतत सांगोपांग चिंतन करीत असता मी, आपणास कसे जाणावे ? आणि हे भगवन् ! कोणकोणत्या भावामध्ये मी आपले

चिंतन करू? म्हणून हे जनार्दना! आपण आपल्या विभूती आणि योगास विस्तारपूर्वक पुन्हा सांगा, कारण की, आपली अमृतमय वाणी ऐकून माझी तृप्ती होत नाही. ॥ १७-१८ ॥

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—हो, ठीक आहे. मी आपल्या दिव्य विभूती तुझ्याकरिता संक्षेपाने सांगेन कारण की, कुरुकुळातील श्रेष्ठा! माझ्या विभूतीच्या विस्ताराचा शेवट नाही. ॥ १९ ॥

**भगवन्! आपल्या त्या दिव्य विभूती कोणत्या आहेत?**

हे गुडाकेश! सर्व प्राणिमात्रांच्या आदि, मध्य आणि अन्तीसुद्धां मीच आहे आणि प्राण्यांच्या अन्तःकरणामध्ये आत्मरूपानेसुद्धा मीच स्थित आहे. अदितीच्या पुत्रांमध्ये विष्णु (वामन) आणि प्रकाशमान वस्तूंमध्ये किरणेवाला सूर्य मी आहे. मरुतांचे तेज आणि नक्षत्रांचा राजा चन्द्र मी आहे. वेदांमध्ये सामवेद, देवतांमध्ये इन्द्र, इंद्रियांमध्ये मन आणि प्राण्यांची चेतना (प्राणशक्ति) मी आहे. अकरा रूद्रांमध्ये शंकर, यक्ष राक्षसांमध्ये कुबेर, आठ वसूंमध्ये अग्नी आणि शिखरयुक्त पर्वतांमध्ये मेरू पर्वत मी आहे. पार्था! पुरोहितांमध्ये मुख्य बृहस्पतीला माझे स्वरूप समज.

**आणखी आपल्या कोणत्या विभूती आहेत?**

सेनापतींमध्ये कार्तिकस्वामी आणि सरोवरांमध्ये सागर मी आहे. महर्षींमध्ये भृगुऋषी, शब्दांमध्ये एक अक्षर (प्रणव), सर्व यज्ञांमध्ये जपजज्ञ आणि स्थिर राहणारांमध्ये हिमालय मी आहे. सर्व वृक्षांमध्ये पिपळ, देवर्षींमध्ये नारद, गन्धर्वांमध्ये चित्ररथ आणि सिद्ध पुरूषांमध्ये कपिलमुनि मी आहे. घोड्यांमध्ये समुद्र मंथनाचेवेळी अमृताबरोबर प्रगट झालेल्या उच्चैःश्रवा नांवाच्या घोड्याला, श्रेष्ठ हत्तींमध्ये ऐरावत नावाच्या हत्तीला आणि मानवांमध्ये राजाला माझी विभूती समज. ॥ २०–२७ ॥

**भगवन् ! आणखी कोणाला आपल्या विभूती समजू ?**

अस्त्र-शस्त्रांत वज्र आणि गायींमध्ये कामधेनु मी आहे. धर्मानुसार सन्तान उत्पतीचा हेतु कामदेव मी आहे आणि सर्पामध्ये वासुकी मी आहे. नागांमध्ये शेषनाग, जलचरांमध्ये-जलदेवतांमध्ये त्यांचा अधिपति वरुण, पितरांमध्ये अर्यमा आणि शासन करणारांमध्ये यमराज मी आहे. दैत्यांमध्ये प्रल्हाद, गणना करणारांमध्ये काल, पशूंमध्ये सिंह आणि पक्ष्यांमध्ये गरूड मी आहे.पवित्र करणारांमध्यें वारा, शस्त्र धारण करणारांमध्ये राम, जलजन्तूंमध्ये मगर आणि वाहणाऱ्या प्रवाहांमध्ये गंगा मी आहे. ॥ २८—३१ ॥

**आणखी आपण कोण-कोणांमध्ये आहात ?**

अर्जुना ! संपूर्ण सृष्टीचा उत्पत्ती, स्थिति आणि लय मीच आहे. विद्यांमध्ये अध्यात्मविद्या आणि परस्पर शास्त्रार्थ करणारांचा तत्त्व-निर्णयाकरिता केला जाणारा वाद मी आहे. अक्षरांमध्ये अकार आणि समासांमध्ये द्वन्द्व समास मी आहे. अक्षयकाल म्हणजेच काळाचा-सुद्धा महाकाळ तसेच सर्व दिशांना तोंड असणारा धातासुद्धा मी आहे. ॥ ३२-३३ ॥

**आणखी आपण कोणकोणत्या रूपांमध्ये आहात ?**

सर्वांचे हरण करणारा मृत्यू आणि उत्पन्न होणारांच्या उत्पत्तीचे निमित्त मी आहे. स्त्री जातींमध्ये कीर्ति, श्री, वाक्, स्मृती, धारणशक्ती आणि क्षमा मी आहे. गायिल्या जाणाऱ्या श्रुतींमध्ये बृहत्साम आणि वैदिक छंदांमध्ये गायत्री छन्द मी आहे. बारा महिन्यांमध्ये मार्गशीर्ष आणि सहा ऋतूंमध्ये वसन्त मी आहे. फसविणारांमध्ये जुगार आणि तेजस्वीयांमध्ये तेज मी आहे. जिंकणारांचा विजय, निश्चय करणारांचा निश्चय आणि सात्त्विक पुरुषांचा सात्त्विक भाव मी आहे. ॥ ३४—३६ ॥

**भगवन् ! आणखी आपली कोणती रूपें आहेत ?**

वृष्णिवंशांमध्ये वासुदेव, पांडवांमध्ये धनंजय (तू) मुनींमध्ये वेदव्यास आणि कवींमध्ये शुक्राचार्य मी आहे.दमन करणारांमध्ये दंड, विजय इच्छिणारांमध्ये नीति, गोपनीयतेमध्ये मौन आणि ज्ञानवानांमध्ये ज्ञान मी आहे. आणखी दुसरे काय सांगू ? सर्व प्राणमात्रांचे बीज कारण मीच आहे. कारण की अर्जुना ! माझ्याशिवाय कोणीसुद्धा चर-अचर प्राणी नाही, म्हणजेच चर-अचर सर्व काही मीच आहे. ॥ ३७—३९ ॥

**आपण आपल्या सर्व विभूति सांगितल्या काय ?**

नाही हे परंतपा ! माझ्या दिव्य विभूतींचा अन्त नाही. मी तुझ्यासमोर माझ्या विभूतींचा जो विस्तार सांगितला, तो तर केवळ संक्षेपरूपाने सांगितला आहे. मी माझ्या विभूती पूर्णपणे तर सांगूच शकत नाही पण मी तुला माझ्या विभूतींबद्दल एक ओळख सांगतो ॥ ४० ॥

**महाराज ती ओळख काय आहे ?**

जगतामध्ये जी जी काही ऐश्वर्ययुक्त, शोभायुक्त आणि बलयुक्त वस्तू आहे. त्या त्या वस्तूला तू माझ्याच तेजाच्या (योगाच्या) कोणत्यातरी अंशापासून उत्पन्न झालेली समज. ॥ ४१ ॥

**भगवन् ! 'आणरवी काय ओळख आहे ?**

अर्जुना, सर्व जगताला (अनंत कोटी ब्रह्मांडाला) आपल्या एका अंशामध्ये धारण करून मी तुझ्यासमोर हातामध्ये लगाम आणि चाबुक घेऊन बसलो आहे. तुझ्या आज्ञेचे पालन करीत आहे. मग तुला अशा-प्रकारच्या पुष्कळ गोष्टी जाणून घेण्याची काय जरूरी आहे ? ॥ ४२ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय अकरावा

अर्जुन म्हणाला—हे भगवन्ता ! केवळ कृपा करण्याकरिता आपण जी परम गुप्त आध्यात्मिक गोष्ट (सर्वांचे मूळकारण मी आहे) सांगितली, त्यामुळे माझा मोह निघून गेलेला आहे, हे कमलनयना ! मी आपणाकडून सर्व प्राणिमात्रांच्या उत्पत्ती आणि प्रलयाची गोष्ट ऐकली तसेच आपले अविनाशी माहात्म्यसुद्धा विस्तारपूर्वक ऐकले. ॥ १-२ ॥

**आता तू आणखी काय इच्छितोस ?**

हे पुरुषोत्तमा ! आपण आपणास जसे सांगत आहात, वास्तविक गोष्ट बरोबर तशीच आहे. आता हे परमेश्वरा ! मी आपले ते परम ज्ञान, शक्ती, ऐश्वर्य, बल, वीर्य व तेजयुक्त रूप पाहू इच्छितो, ज्याच्या एका अंशामध्ये अनन्त कोटी ब्रह्माण्डे व्याप्त आहेत. परन्तु हे प्रभो ! आपले ते परम ऐश्वर्यादियुक्त रूप मी पाहू शकेन असे जर आपण मानत असाल तर हे योगेश्वरा ! आपण आपले ते अविनाशी स्वरूप मला दाखवा ना ! ॥ ३-४ ॥

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—हे पार्था ! तू माझ्या एका रूपालाच काय, माझ्या शेकडो, हजारो रूपांना पहा, जी दिव्य आहेत, अनेक प्रकारची आहेत, अनेक रंगाची आहेत आणि अनेक प्रकारच्या आकृत्यांची आहेत. ॥ ५ ॥

**भगवन् ! आणखी काय पाहू ?**

हे भरतकुलांतील श्रेष्ठ अर्जुना ! तू बारा आदित्यांना, आठ वसूंना अकरा रूद्रांना, दोन अश्विनीकुमारांना तसेच एकोणपन्नास मरूतानासुद्धा

पहा. ज्या रूपांना तू अगोदर कधीहि पाहिले नाहीस, अशा पुष्कळ आश्चर्यकारक रूपांनासुद्धा तू पहा. ॥ ६ ॥

**मी कोठे पाहू. ?**

हे निद्रेला जिंकणाऱ्या अर्जुना ! माझ्या या शरीराच्या कोणत्याहि एका अंशामध्ये चराचरासह सर्व जगताला तू आता पहा. जर याशिवाय तू आणखी काही पाहू इच्छितोस , तर तेसुद्धा तू पहा.* ॥ ७ ॥

**आपण तर पुन्हा पुन्हा तू, 'पहा' असे म्हणत आहात. परन्तु मला तर ते दिसत नाही, कसे पाहू ?**

भैय्या ! तू आपल्या या चर्मचक्षूने मला पाहू शकणार नाहीस. घे. मी तुला दिव्यचक्षु देतो, त्याने तू माझ्या या ईश्वरसम्बन्धी सामर्थ्याला पहा. ॥ ८ ॥

**संजया ? असे म्हटल्यानंतर भगवान श्रीकृष्णांनी काय केले ?**

संजय म्हणाला—हे राजा धृतराष्ट्रा ! असे बोलून महायोगेश्वर भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला आपले परम ऐश्वर्यमय रूप दाखविले. ॥ ९ ॥

**कोणत्या प्रकारचे रूप दाखविले ?**

ज्याला अनेक तोंडे आणि डोळे आहेत, अनेक प्रकारची विस्मयकारक दर्शने आहेत, अनेक दिव्य आभूषणे आहेत आणि ज्याने हातांमध्ये अनेक प्रकारची दिव्य अस्त्रे व शस्त्रे उचललेली आहेत, अनेक दिव्य हार आणि दिव्य वस्त्रे धारण केलेली आहेत, शरीरावर अनेक दिव्य चन्दन इत्यादी लावलेले आहे, असे सर्वथैव आश्चर्यमय आणि चारी दिशांना तोंडे असणारे आपले अन्तरहित रूप दाखविले ॥ १०-११ ॥

---

* अर्जुन आणखी काय पाहू इच्छित होता ?

अर्जुनाच्या मनात हा संशय होता की, युद्धामध्ये जय आमचा होईल की कौरवांचा ? (गीता अ. २-६) म्हणून भगवान श्रीकृष्ण सांगत आहेत की, तेसुद्धा तू माझ्या शरीराच्या एका अंशात पहा.

**संजया ! ते रूप आश्चर्यमय का होते ?**

जरी आकाशांत हजारो सूर्याचा एकाच वेळी उदय झाला तरीसुद्धा त्या सर्वांचा प्रकाश मिळून त्या विश्वरूपाच्या प्रकाशासमोर काहीसुद्धा नाही. ॥ १२ ॥

**अर्जुनाने ते रूप कोठे पाहिले ?**

अर्जुनानें देवांचा देव अशा भगवान श्रीकृष्णाच्या शरीराच्या एका अंशामध्ये सम्पूर्ण जगताला अनेक विभागांनी युक्त पाहिले. ॥ १३ ॥

भगवान श्रीष्कृष्णाच्या त्या विश्वरूपाला पाहून अर्जुन फारच आश्चर्यचकित झाला आणि त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तो हात जोडून आणि मस्तक झुकवून प्रणाम करीत विश्वरूप भगवान श्रीकृष्णाची स्तुती करू लागला. ॥ १४ ॥

**संजय ! अर्जुन काय बोलला ?**

अर्जुन म्हणाला—हे देवा ! मी आपल्या शरीरामध्ये सर्व देवतांना, प्राण्यांच्या विशेष-विशेष समूहांना, कमळाच्या आसनावर बसलेल्या ब्रह्मदेवाला, कैलासावर विराजमान असणाऱ्या शंकराला, सर्व ऋषींना तसेच दिव्य सर्पांना पाहत आहे. ॥ १५ ॥

हे विश्वरूपा ! श्रीकृष्णा ! हे विश्वेश्वरा ! मी आपणास अनेक हात, उदरे, मुखे आणि डोळे असणारा तसेच सर्व बाजूंनी अनन्तरूपांनी युक्त असा पाहत आहे. मी आपला आरंभ, मध्य व अन्तहि पाहत नाही. मी आपणास डोक्यावर मुकुट तसेच हातामध्ये गदा, चक्र, (शंख आणि पद्म) धारण केलेला, तेजःपुंज, सर्व बाजूंना प्रकाश करणारा, दैदिप्यमान अग्नी आणि सूर्य यांच्याप्रमाणे ज्याची कांती आहे असा, डोळ्यांनी पाहण्यास कठीण असा आणि सर्व बाजूंनी कोणत्याहि प्रमाणाचा विषय न होणारा असा पाहत आहे. ॥ १६-१७ ॥

हे नाथ ! आपणच परम अविनाशी ब्रह्म आहात, आपणच या संपूर्ण विश्वाचे परम आधार आहात आणि आपणच सनातन रक्षण करणारे सनातन पुरुष आहात—असे मी मानत आहे. ॥ १८ ॥

**अर्जुन ! केवळ मानतच आहेस की, पाहतसुद्धा आहेस ?**

मी आपणास आदि, मध्य आणि अन्तरहित, अनन्त प्रभावशाली, ज्याला अनन्त भुजा आहेत असा, चन्द्र आणि सूर्यरूप डोळे असणारा, प्रज्वलित अग्निसमान तोंडे असणारा असा पाहत आहे, तसेच आपल्या तेजाने सर्व जगताला संतप्त करताना पाहत आहे. ॥ १९ ॥

हे महात्मन् ! स्वर्ग व पृथ्वीच्यामधील हे अंतराळ आणि दाही दिशा एक आपणाकडूनच परिपूर्ण होत आहेत. आपल्या ह्या अद्‌भुत आणि उग्ररूपाला पाहून तिन्ही लोक व्यथित होत आहेत. अहो ! मी प्रथम स्वर्गामध्ये पाहिले होते, तेच हे देवतांचे समुदाय आपणामध्ये प्रवेश करीत आहेत. त्यांच्यापैकी काहीतर भयभीत होऊन आपल्या नामांचे आणि गुणांचे कीर्तन करीत आहेत. महर्षि आणि सिद्धांचे समुदाय 'कल्याण होवो, मंगल होवो' असे म्हणत उत्तम उत्तम स्तोत्रांद्वारां आपली स्तुती करीत आहेत. ॥ २०-२१ ॥

जे रूद्र, आदित्य, वसु, साध्यगण, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुद्‌गण, पितर, गन्धर्व, यक्ष, असुर आणि सिद्धांचे संघ आहेत, तेसुद्धा आश्चर्यचकित होऊन आपणास पाहत आहेत. ॥ २२ ॥

हे महाबाहो ! आपले अनेक तोंडे आणि डोळे असणारे, अनेक भुजा, मांड्या आणि पाय असणारे, अनेक उदरे असणारे तसेच अनेक विकराळ दाढा असणारे महान रूप पाहून सर्व प्राणी भयभीत होत आहेत तसेच मी स्वतः सुद्धा भयभीत होत आहे. ॥ २३ ॥

हे विष्णो ! आकाशाला स्पर्श करणारे, पसरलेल्या तोंडाचे,

तसेच प्रदीप्त आणि विशाल नेत्र असणारे आपले दैदिप्यमान रूप पाहून अंतःकरणाने भयभीत झालेला मी धैर्य आणि शान्तीस प्राप्त होत नाही. आपले प्रलयकाळाच्या अग्निसमान प्रज्वलित आणि दाढांमुळे भयानक दिसणारे तोंड पाहून मला दिशांचा पत्ता लागत नाही आणि शांतीही मिळत नाहीं. म्हणून हे देवांच्या ईश्वरा! हे जगन्निवासा! आपण प्रसन्न व्हावे. ॥ २४-२५ ॥

आमच्या बाजूच्या मुख्य योद्ध्यासहित भीष्म, द्रोणाचार्य आणि कर्णसुद्धा आपणामध्ये प्रवेश करीत आहेत. राजांच्या समुदायांसह, धृतराष्ट्राचे ते सर्वच्या सर्व पुत्र आपल्या विकराळ दाढांच्यामुळे भयंकर दिसणाऱ्या अशा तोंडामध्ये मोठ्या त्वरेने प्रवेश करीत आहेत. त्यांच्यापैकी काहीतर चूर्ण झालेल्या मस्तकांसह आपल्या दातांच्यामध्ये फसलेले दिसत आहेत. ॥ २६-२७ ॥

ज्याप्रमाणे नद्यांचे पुष्कळ असे जलप्रवाह स्वाभाविकपणे समुद्राकडेच वाहतात. त्याचप्रमाणे मानवलोकांतील ते भीष्म, द्रोणाचार्य इत्यादी महान शूरवीर आपल्या प्रज्वलित तोडांमध्ये प्रवेश करीत आहेत. ज्याप्रमाणे पतंग मोहवश होऊन आपल्या नाशाकरिता मोठ्या त्वरेने उडत येऊन प्रज्वलित अग्निमध्ये प्रवेश करतात. त्याचप्रमाणे हे दुर्योधन इत्यादी सर्व लोक मोहवश होऊन स्वतःचा नाश करण्याकरिता मोठ्या त्वरेनं आपल्या तोंडामध्ये प्रवेश करीत आहेत आणि आपणसुद्धा आपल्या प्रज्वलित तोंडाने सर्वांना खात खात चारी बाजूंनी पुन्हा पुन्हा चाटीत आहात. हे विष्णो! आपला उग्र प्रकाश आपल्या तेजाने सर्व जगताला सर्वांना संतप्त करीत आहे. ॥ २८—३० ॥

**हे देव श्रेष्ठा! आपणास नमस्कार आहे. आपण प्रसन्न व्हावे. सर्वांचे आदि कारण असणाऱ्या आपणास मी तत्त्वाने**

**जाणू इच्छित आहे. मला हे सांगा की, उग्ररूप धारण केलेले आपण कोण आहात ?**

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले—मी सर्व लोकांचा नाश करणारा वाढलेला असा काळ आहे.

**भगवन् ! आपण येथें का आला आहात ?**

यावेळी मी या सर्व लोकांचा संहार करण्याकरिता येथे आलो आहे.

**येथे आपणाकडून कोणी वाचेल का नाहीं ?**

तुझ्या विरोधी पक्षामध्ये जेवढे योद्धे उभे आहेत, ते सर्व युद्ध केले नाही तरीही राहणार नाहीत. हे सर्वच्या सर्व माझ्याकडून अगोदरच मारले गेलेले आहेत. म्हणून तू युद्धाकरिता उभा रहा आणि यशाची प्राप्ती कर तसेच शत्रूंना जिंकून धनधान्याने संपन्न असणाऱ्या राज्याची प्राप्ती करून घे.

**तर मग मला युद्ध करण्याची काय जरूरी आहे ?**

हे अर्जुना ! तू केवळ निमित्तमात्र हो.॥ ३१-३३॥

**परन्तु महाराज ! भीष्म, द्रोणाचार्य, जयद्रथ, कर्ण इत्यादि शूर वीरांवर विजय कसा प्राप्त होईल ?**

भीष्म, द्रोणाचार्य, जयद्रथ कर्ण तसेच अन्यसुद्धा जेवढे शूरवीर आहेत. ते सर्व माझ्याकडून अगोदरच मारले गेलेले आहेत. त्या माझ्याकडून मारले गेलेल्या शूरवीरांनाच तू मार. म्हणून तू भयभीत होऊ नकोस आणि युद्ध कर. तू युद्धामध्ये सर्व शत्रूंना जिंकशील.॥ ३४॥

**संजया ! यानंतर काय झाले ?**

संजय म्हणाला—भगवान केशवाची अशी वचने ऐकून भयानें कापत अर्जुन हात जोडून नमस्कार करून आणि अत्यन्त भयभीत होत्साता पुन्हा प्रणाम करून सद्गदित वाणीने भगवान श्रीकृष्णांची स्तुती करू लागला.॥ ३५॥

**संजया ! अर्जुन काय म्हणाला ?**

अर्जुन म्हणाला—अन्तर्यामी भगवान् श्रीकृष्णा ! आपले नाम, गुण इत्यादींचे कीर्तन केल्यामुळे हे सम्पूर्ण जगत् आनंदित होत आहे आणि अनुरागाला प्राप्त होत आहे. आपले नाम, गुण इत्यादींच्या कीर्तनाने भयभीत होऊन राक्षस लोक दाही दिशांना पळत आहेत आणि सिद्धांचा समुदाय आपणास नमस्कार करीत आहे. हे सर्व होणे योग्यच आहे. ॥ ३६ ॥

**अर्जुना ! हे सर्व योग्य का आहे ?**

कारण की, आपण अनन्त आहात, सर्व देवतांचे मालक आहात आणि ह्या जगताचे आधार आहात. आपण अक्षरस्वरूप आहात. आपण सत्-सुद्धा आहात, असत्सुद्धा आहात आणि सत्-असत्च्याही पलीकडे जे काही आहे तेसुद्धा आपणच आहात, हे महात्मन् ! आपण गुरूचेही गुरू आणि ब्रह्मदेवालासुद्धा उत्पन्न करणारे आहात अशा असणाऱ्या आपणास ते सिद्धांचे समुदाय नमस्कार का करणार नाहीत. ॥ ३७ ॥

आपणच देवादिदेव आणि पुराणपुरुष आहात. आपणच या जगताचे परम आधार आहात. आपणच सर्वांना जाणणारे आणि सर्वांकडून जाणण्यास योग्य आहात. आपणच सर्वांचे परम गन्तव्य स्थान आहात. हे अनन्तरूप भगवान श्रीकृष्णा ! हे सम्पूर्ण जगत् आपणाकडूनच व्यापलेले आहे. ॥ ३८ ॥

आपणच वायू, यमराज, अग्नी, वरुण, चन्द्र, प्रजापती आणि पितामह ब्रह्मदेवाचेसुद्धा पिता आहात. म्हणून आपणास हजारवेळा नमस्कार असो ! नमस्कार असो ! आणि पुन्हा सुद्धा आपणास परत परत नमस्कार असो ! नमस्कार असो ! हे सर्व दिशांमध्ये स्थित असलेल्या ! आपणास समोरून नमस्कार असो ! पाठीमागून नमस्कार असो ! सर्व

बाजूंनीच नमस्कार असो ! हे अनन्तवीर्य भगवान श्रीकृष्णा ! आपण अमर्याद विक्रम करणारे आहात. आपण सर्व जगताला व्यापलेले आहे. म्हणून सर्व काही आपणच आहात. ॥ ३९-४० ॥

हे भगवान् श्रीकृष्णा ! आपल्या ह्या महिम्याला आणि स्वरूपाला न ओळरवता मी आपणास मित्र समजून प्रमादाने अथवा प्रेमाने (विचार न करता, न समजता) हे कृष्णा ! हे यादवा ! हे सख्या ! अशाप्रकारे जे काही बोललो आहे आणि हे अच्युता ! चालता-फिरता, झोपता-जागता, उठता-बसता, खाता-पिता, एकटे असता अथवा ते मित्र, कुटुम्बीय इत्यादींच्या समोर असता, मी हास्य-विनोदामध्ये आपला जो तिरस्कार केला त्याकरिता अप्रमेयस्वरूप असणाऱ्या आपणासमोर मी क्षमा मागत आहे. ॥ ४१-४२ ॥

आपणच या चराचर जगताचे पिता आहात. आपणच पूजनीय आहात आणि आपणच गुरूंचेही महान गुरू आहात. हे असीम प्रभाव असणाऱ्या भगवान श्रीकृष्णा ! ह्या तिन्ही लोकांमध्ये आपणासारखासुद्धा दुसरा कोणी नाहीं मग आपल्यापेक्षा अधिक तर कोण होऊच कसा शकतो ! म्हणून साष्टांग दण्डवत घालून स्तुती करण्यायोग्य ईश्वरस्वरूप आपणास मी प्रणाम करून प्रसन्न करू इच्छित आहे. ज्याप्रमाणे पिता-पुत्राच्या, मित्र-मित्राच्या आणि पती-पत्नीच्या तिरस्कारास सहन करीत असतो.अशाप्रकारेच हे देवा ! माझ्याकडून केल्या गेलेल्या तिरस्कारास आपण सहन करा. ॥ ४३-४४ ॥

**ठीक आहे.आता तूं काय इच्छितोस ?**

आपल्या अशा अपूर्व रूपाला पाहून मी आनंदितसुद्धा झालेलो आहे आणि त्याचबरोबर भयामुळे माझे मन व्याकुळसुद्धा होत आहे. म्हणून हे देवेशा ! हे जगन्निवासा ! आपण प्रसन्न व्हावे आणि आपण तेच

देवरूप (विष्णुरूप) दाखवावे. ज्याने मस्तकावर मुकुट धारण केलेला आहे आणि हातामध्ये गदा, चक्र, शंख आणि पद्म घेतलेले आहे. मी आता आपल्या त्याच रूपाला पाहू इच्छित आहे. हे सहस्रबाहो ! हे विश्वमूर्ते ! आपण त्याच चतुर्भुज रूपामध्ये प्रगट व्हा. ॥ ४५-४६ ॥

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले—हे अर्जुना ! मी फार प्रसन्न होऊन आपल्या सामर्थ्याने तुला हे अत्यन्त श्रेष्ठ तेजोमय सर्वांचे आदि आणि अनन्त असे विश्वरूप दाखविले आहे. ज्याला तुझ्याशिवाय प्रथम कोणीही पाहिलेले नाही. ॥ ४७ ॥

**भगवन् ! आपल्या ह्या विश्वरूपाला मनुष्य कोणत्या साधनानें पाहू शकेल ?**

कोणत्याही साधनाने नाही. हे कुरुप्रवीरा ! मानवलोकामध्ये तुझ्यासारखा कृपेस पात्र झाल्याशिवाय ह्या प्रकारच्या रूपाला कोणी वेदाध्ययन, यज्ञ, दान, उग्र तपस्या आणि मोठ मोठ्या क्रियेंनीसुद्धा पाहू शकत नाही . ॥ ४८ ॥

**परन्तु भगवन्ता ! यावेळीं तर मी आपल्या घोर रूपाला पाहून फार भयभीत झालेलो आहे. काय करू ?**

माझे असे घोर रूप पाहून तू भयभीत होता कामा नये आणि आपणामध्ये विमूढभाव (मोह) सुद्धा येऊ देऊ नये. आता तू भयरहित आणि प्रसन्न मनाचा होऊन माझ्या त्या रूपाला पुन्हा पहा. ॥ ४९ ॥

**संजया ! असे म्हणून भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला कोणते रूप दाखविले ?**

संजय म्हणाला—असे म्हणून भगवान वासुदेवांनी अर्जुनाला आपले चतुर्भुज रूप दाखविले. मग भगवान् श्रीकृष्णांनी पुन्हा सौम्य द्विभुजरूप होऊन भयभीत झालेल्या अर्जुनाला धीर दिला. ॥ ५० ॥

**अर्जुना ! आता तर तुझी भीति दूर झाली ना ?**

अर्जुन म्हणाला. हे जर्नादना ! आपल्या या सौम्य मनुष्यरूपाला पाहून आता मी स्थिर चित्त झालेलो आहे आणि आपल्या स्वाभाविक स्थितीमध्ये आलो आहे. ॥ ५१ ॥

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—तू माझे जे हे चतुर्भुजरूप पाहिलेस, याचे दर्शन फारच दुर्लभ आहे. देवतालोकसुद्धा या रूपाला पाहण्याकरिता सतत लालायित राहतात. तू मला जसे पाहिले आहेस, तसा मी वेदांनी तपाने, दानाने आणि यज्ञानेसुद्धा पाहिला जाऊ शकत नाही. ॥ ५२-५३ ॥

**तर मग आपण कशाने पाहिले जाऊ शकता ?**

हे शत्रुंना ताप देणा-या अर्जुना ! अशा प्रकारचे चतुर्भुज रूप असणारा मी अनन्यभक्तिद्वाराच पाहिला जाऊ शकतो. केवळ पाहिलाच जाऊ शकत नाही, तर तत्त्वाने ओळखलासुद्धा जाऊ शकतो आणि प्राप्तसुद्धा केला जाऊ शकतो. ॥ ५४ ॥

**भगवन्ता ! ती अनन्यभक्ती कशी असते ?**

हे पाण्डवा ! सर्व कर्मे माझ्याकरिता करणे, मलाच परायण होणे. माझाच भक्त होणे, आसक्तिरहित होणे आणि कोणत्याही प्राण्याबरोबर वैर न ठेवणे—अशा भक्तीने युक्त झालेला भक्त मलाच प्राप्त होतो. ॥ ५५ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय बारावा

**अर्जुन म्हणाला—आता आपण असे सांगितले की, काही तर सतत आपणामध्ये चित्त ठेवून आपल्या सगुण साकार स्वरूपाची उपासना करतात आणी काही आपल्या अक्षर अव्यक्त अशा निर्गुण निराकार स्वरूपाची उपासना करतात. त्या दोन्ही प्रकारच्या उपासकांमध्ये कोणते उपासक श्रेष्ठ आहेत ? ॥ १ ॥**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—माझ्यामध्ये मनाला लावून नित्य निरंतर मत्परायण झालेले जे भक्त परम श्रद्धायुक्त होऊन माझी उपासना करतात, त्यांना मी सर्वश्रेष्ठ उपासक मानतो. ॥ २ ॥

**परन्तु जे आपल्या अव्यक्त रूपाची उपासना करत असतात. त्यांना ?**

सर्व ठिकाणी समबुद्धी ठेवणारे आणि प्राणिमात्राच्या हितामध्ये रत राहणारे जे मानव आपल्या इंद्रियांचे संयमन करून सर्व ठिकाणी परिपूर्ण, अचिन्त्य, कूटस्थ, अचल, अनिर्देश्य, ध्रुव, अक्षर आणि अव्यक्ताची उपासना करतात, तेसुद्धा मलाच प्राप्त होतात. ॥ ३-४ ॥

**भगवन्ता ! तर मग आपली भक्ती करणारे श्रेष्ठ कसे झाले ?**

ज्यांचे चित्त अव्यक्तामध्ये आसक्त झालेले आहे असे मानव अव्यक्त स्वरूपाची उपासना करतात. त्यांना आपल्या साधनांमध्ये अधिक कष्ट होतात. कारण की, ज्यांना देहाचा अभिमान आहे अशांना अव्यक्त स्वरूपाची प्राप्ती फार कष्टाने होते. परंतु जे सर्व कर्मे मला अर्पण करून मत्परायण झालेले आहेत आणि अनन्यभावाने माझेच ध्यान करून माझी

उपासना करतात, हे पार्था ! ज्यांचे चित्त माझ्यामध्ये लागलेले आहे अशा त्या भक्तांचा मी स्वतः मृत्युरूपी संसारसागरातून फार लवकर उद्धार करणारा बनतो. ॥ ५—७ ॥

**भगवन् ! असा भक्त मी कसा बनू शकतो ?**

तू मन माझ्यामध्येच लाव आणि बुद्धीला माझ्यामध्येच लाव. लावल्यानंतर तू माझ्यामध्येच निवास करशील, यांत संशय नाही. जर अशाप्रकारे मन-बुद्धीला माझ्यामध्ये स्थिर करण्यास तू असमर्थ आहेस, तर हे धनंजया ! तू अभ्यासयोगाच्या द्वारे माझ्या प्राप्तीची इच्छा कर . जर तू अभ्यास योगातही असमर्थ आहेस, तर माझ्याकरिता कर्म करण्यास तत्पर हो. माझ्याकरिता कर्म करण्यामुळेसुद्धा तू सिद्धीला प्राप्त होशील. जर तू माझ्याकरिता कर्म करण्यातसुद्धा असमर्थ आहेस, तर तू माझ्या भक्तियोगाचा आश्रित होऊन मन आणि बुद्धीला ताब्यात ठेवून सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर. ॥ ८—११ ॥

**भगवन्ता ! अशा क्रमानें तर कर्मफलाचा त्याग करणे चार नंबरचे निकृष्ट साधन झाले ना ?**

नाही. योगरहित (समतारहित) अभ्यासापेक्षा शास्त्रीय ज्ञान श्रेष्ठ आहे. योगरहित शास्त्रीय ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे आणि योगरहित ध्यानापेक्षा कर्मांच्या फलाचा त्याग करणे श्रेष्ठ आहे. कारण की , त्यागाने ताबडतोब परम शान्ती प्राप्त होते. ॥ १२ ॥

**भगवन् ! वर सांगितलेल्या चारी साधनांपैकी कोणत्या एका साधनाने आपणास प्राप्त झालेल्या सिद्ध भक्ताची काय लक्षणे असतात ? अर्थात् त्याच्यामध्ये कोणते कोणते गुण असतात ?**

त्याचा कोणत्याही प्राण्याबरोबर द्वेष नसतो, इतकेच नाही, त्याची सर्व प्राण्यांबरोबर मित्रता (प्रेम) आणि सर्वांवर करुणा (दयाळुभाव) राहते. तो अहंता आणि ममतारहित, क्षमाशील तसेच सुखदुःखाच्या

प्राप्तीमध्ये सम राहतो, तो प्रत्येक परिस्थितीमध्ये सतत सन्तुष्ट राहतो. शरीर, इन्द्रिये मन इत्यादी त्याच्या ताब्यात राहतात, त्याची मन-बुद्धी मलाच अर्पण केलेली असते, असा तो दृढनिश्चयी भक्त माझा आवडता भक्त आहे. ॥ १३-१४ ॥

**आणखी कोण आपला आवडता आहे ?**

ज्या भक्तापासून दुसऱ्यांना उद्वेग होत नाही आणि ज्याला स्वतःलाही दुसऱ्यांपासून उद्वेग होत नाही,असा हर्ष, ईर्ष्या, भय आणि उद्वेगरहित भक्त माझा आवडता भक्त आहे. ॥ १५ ॥

**भगवन्ता ! आणखी कोण आपला आवडता आहे ?**

जो आपणाकरिता कोणत्याही वस्तूची, व्यक्ती इत्यादींची आवश्यकता ठेवत नाही, जो अन्तर्बाह्य पवित्र आहे, जो दक्ष (चतुर) आहे, म्हणजे ज्याकरिता मनुष्यशरीर मिळाले, ते भगवंताच्या प्राप्तीचे काम त्याने केलेले आहे, जो संसारात उदासीन राहतो, ज्याच्या हृदयामध्ये कोणतीही हालचाल नसते. तसेच जो भोग आणि संग्रहाकरिता केल्या जाणाऱ्या सर्व कर्मांचा सर्वप्रकारे त्याग करतो, असा भक्त मला आवडता आहे. ॥ १६ ॥

**आणखी कोण आपला आवडता आहे ?**

जो अनुकूलता प्राप्त झाल्यावर हर्षित होत नाही आणि प्रतिकूलता प्राप्त झाल्यावर द्वेष करीत नाही, तसेच जो दुःखकारक परिस्थिती प्राप्त झाल्यावर शोक करीत नाही आणि सुखकारक परिस्थितीची इच्छाही करीत नाही, तसेच जो शुभ-अशुभ कर्मामध्ये राग-द्वेषाचा त्यागी आहे. असा भक्त माझा आवडता भक्त आहे. ॥ १७ ॥

**भगवन्ता ! आणरवी कोण आपला आवडता आहे ?**

जो शत्रु-मित्र, मान-अपमान, अनुकूलता-प्रतिकूलता आणि सुख-

दुःखामध्ये समता ठेवणारा तसेच संसाराच्या आसक्तीपासून रहित आहे, जो निंदा-स्तुतीला समान समजणारा आहे, जो मननशील आहे, जो ज्या कोणत्याही प्रकारानेसुद्धा शरीराचा निर्वाह होण्यामध्ये सन्तुष्ट आहे, जो राहण्याच्या ठिकाणी तसेच शरीरामध्येसुद्धा ममता आसक्तीपासून रहित आहे आणि ज्याची बुद्धी स्थिर आहे. असा भक्त माझा आवडता आहे * ॥ १८-१९ ॥

**आतापर्यंत तर आपण आपल्या सिद्ध भक्तांना आवडता भक्त सांगितले, आता हे सांगा की, आपणास अत्यन्त आवडता कोण आहे ?**

जे श्रद्धा प्रेमपूर्वक मत्परायण झालेले आहेत आणि आता सांगितलेल्या सिद्ध भक्तांच्या लक्षणांचे आवडीने सेवन करणारे आहेत, असे साधक भक्त मला फार आवडते आहेत. ॥ २० ॥

* येथपर्यंत पाच प्रकारच्या सिद्ध भक्तांच्या लक्षणांचे वर्णन झालेले आहे. पाचही प्रकारच्या भक्तांचे वेगळे लक्षण सांगण्याचे हे तात्पर्य आहे की, भक्तांचा स्वभाव, त्यांची साधनपद्धती वेगळी वेगळी असते. म्हणून कोणत्याही भक्तामध्ये मुख्यरूपाने कोणते तरी लक्षण बसत असते. (सिद्ध होते) तर कोणामध्ये कोणते तरी लक्षण बसते. (सिद्ध होते) परन्तु संसारसंबंधाचा त्याग आणि भगवंताच्या ठिकाणी प्रेम सर्वांचे साररवेंच असते.



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय तेरावा

**जे आपल्या सगुण साकाररूपाची उपासना करतात, ते तर आपणास फार आवडते होतात, आता हे सांगा की, जे आपल्या निर्गुण-निराकार-रूपाची उपासना करतात, ते कसे असतात ?**

भैय्या ! ते विवेकी असतात.

**भगवन्ता ! विवेक कोणाचा होत असतो ?**

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचा. हे कुंतीपुत्रा अर्जुना ! 'इदम्-हे' या रूपाद्वारे सांगितले गेलेल्या शरीराला 'क्षेत्र' म्हणतात आणि जो ह्या शरीराला ओळखतो (जाणतो) त्याला ज्ञानीलोक 'क्षेत्रज्ञ' (शरीरी) म्हणतात. ॥ १ ॥

**त्या क्षेत्रज्ञाचे स्वरूप काय आहे ?**

हे अर्जुना ! सर्व क्षेत्रांमध्ये (शरीरांमध्ये) क्षेत्रज्ञरूपाने (शरीरीरूपाने) मीच आहे. असे तू जाण.

**भगवन्ता ! ते जाणणे काय आहे ?**

क्षेत्र वेगळे आहे आणि * क्षेत्रज्ञ वेगळा आहे. याला योग्य प्रकारे जाणणेच माझ्या मते ज्ञान आहे. तात्पर्य हे आहे की, क्षेत्राची संसाराबरोबर

---

* येथे 'सर्व क्षेत्रांमध्ये क्षेत्रज्ञ मलाच जाण' असे म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, हे शरीर तर प्रकृतीचा अंश आहे, म्हणून तू यापासून सर्वथा विन्मुख हो आणि तू माझा अंश आहेस, म्हणून तू सर्वथा मज सन्मुख हो.दुसरे तात्पर्य हे आहे की, तू जेथे क्षेत्राबरोबर (शरीराबरोबर) आपली एकता स्विकारलेली आहे, तेथे माझ्याबरोबर आपली एकता स्विकार कर. कारण की, वास्तविक तुझी शरीराबरोबर एकता नाही आणि मजबरोबर तुझी स्वतःसिद्ध एकता आहे. हे तू जाणनू घे.

एकता आहे आणि क्षेत्रज्ञाची माझ्याबरोबर एकता आहे. ह्याचा योग्य तो अनुभव घेणे म्हणजेच माझ्या मते ज्ञान आहे. ॥ २ ॥

**क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाकरिता कोणत्या गोष्टी जाणणे आवश्यक आहे ?**

सहा गोष्टी जाणणे आवश्यक आहे. क्षेत्राच्या विषयात चार आणि क्षेत्रज्ञाच्या विषयात दोन. ते 'क्षेत्र' जे आहे, जसे आहे, ज्या विकारांनी युक्त आहे. आणि ज्याच्यापासून उत्पन्न झालेले आहे, तसेच तो 'क्षेत्रज्ञ' जो आहे आणि ज्या प्रभावाने युक्त आहे. ते सर्व संक्षिप्तरूपानें तू मजकडून ऐक. ॥ ३ ॥

**भगवन्ता ! तर मग याचे विस्ताराने वर्णन कोठे झालेले आहे ?**

ऋषींनी, वेदांच्या ऋचांनी आणि युक्तियुक्त तसेच निश्चित केलेल्या ब्रह्मसूत्रांच्या पदांनी ह्याला विस्तारानें सांगितले आहे. ॥ ४ ॥

**ते क्षेत्र काय आहे ?**

मूळ प्रकृती, समष्टी बुद्धी (महत्तत्त्व), समष्टी अहंकार, पांच महाभूते, दहा इंद्रिये, एक मन आणि इंद्रियांचे पाच विषय ही चोवीस तत्त्वे असणारे हे क्षेत्र आहे.* ॥ ५ ॥

**ते क्षेत्र कोणत्या विकारांनी युक्त आहे ?**

इच्छा, द्वेष, सुख, दुःख, शरीर, प्राणशक्ती आणि धारणाशक्ती, ह्या सात विकारांसहित हे क्षेत्र मी संक्षिप्तरूपाने सांगितले. ॥ ६ ॥

---

* मूल प्रकृती सर्वांची जननी आहे. त्या प्रकृतीपासून बुद्धिरूपी मुलगी उत्पन्न झाली. बुद्धीपासून अहंकाररूपी मुलगा उत्पन्न झाला. अहंकाराची सन्ताने झाली-पृथ्वी जल, तेज, वायू आणि आकाश ही पाच महाभूते. पाच महाभूतांची सन्ताने झाली दहा इंद्रिये, एक मन आणि शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच विषय. इंद्रिये, मन आणि पाच विषय यांच्यापासून कोणेतेही सन्तान उत्पन्न झाले नाही.

भगवन्ता विकारासह क्षेत्र 'इदम्-हे' यारूपानें आपल्यापासून वेगळे कसे दिसेल ?

१. आपल्यामध्ये श्रेष्ठतेच्या अभिमानाचा अभाव.

२. आपल्यामध्ये दिखावूपणा नसणे.

३. शरीर, मन आणि वाणीने कोणालाही किंचितसुद्धा दुःख न देणे.

४. क्षमेची भावना.

५. शरीर मन आणि वाणीची सरळता.

६. ज्ञानप्राप्तीकरिता गुरूजवळ जाऊन त्यांची सेवा इत्यादी करणे.

७. शरीर आणि अन्तःकरणाची शुद्धी.

८. आपल्या ध्येयापासून विचलित न होणे.

९. मनाला ताब्यात ठेवणे.

१०. इंद्रियांच्या विषयांविषयी वैराग्य उत्पन्न होणे.

११. अहंकाररहित होणे.

१२. वैराग्याकरिता जन्म, मृत्यु, वृद्धावस्था आणि रोगांमध्ये दुःखरूप दोषांच्या मूळ कारणाला पाहणे.

१३. आसक्तिरहित होणे.

१४. स्त्री, पुत्र, घर इत्यादिकांमध्ये तल्लीन न होणे.

१५. अनुकूलतेच्या आणि प्रतिकूलतेच्या प्राप्तीत चित्त हे सतत सम राहणे.

१६. संसारात उपरती आणि माझी अव्यभिचारी भक्ती असणे.

१७. एकान्त स्थानामध्ये राहण्याचा स्वभाव असणे.

१८. जनसमुदायाबाबत आवड नसणे.

१९. परमात्म्याच्या सत्तेचे नित्य निरंतर मनन करणे.

२०. सर्व ठिकाणी परमात्म्यालाच पाहणे.

या वीस साधनांनी शरीर 'इदम्-हे' यारूपात दिसू लागेल. शरीरराला 'हे' यारूपाने (आपल्यापासून वेगळे) पाहणे हे ज्ञान आहे आणि याच्या विरुद्ध शरीराला आपले स्वरूप समजणे हे अज्ञान आहे. ॥ ७—११ ॥

**या ज्ञानापासून प्राप्त होणारे तत्त्व काय आहे ?**

ज्ञेय-तत्त्व (परमात्मा) आहे. मी आता त्या ज्ञेय तत्त्वाचे वर्णन करीन की, ज्याला जाणल्यामुळे अमरपदाची प्राप्ती होते.

**त्या ज्ञेय-तत्त्वाचे स्वरूप काय आहे ?**

ते आदि आणि अन्त यापासून रहित आणि परम ब्रह्म आहे. ते सत् म्हटले जाऊ शकत नाही आणि असत् म्हटले जाऊ शकत नाही.* ॥ १२ ॥

**भगवन्ता ! तरी सुद्धा ते कसे आहे ?**

ते सर्व ठिकाणीच हात आणि पाय असणारे, सर्व ठिकाणीच डोळे, मस्तके आणि मुखे असणारे, तसेच सर्व ठिकाणीच कान असणारे आहे. ते सर्वांना व्यापून स्थित आहे. ते सर्व इंद्रियांपासून रहित आहे आणि सर्व इंद्रियांच्या विषयांना प्रकाशित करणारे आहे. ते आसक्तिरहित आहे आणि सर्व जगताचे भरण पोषण करणारे आहे. ते गुणांपासून रहित आहे आणि गुणांचा भोक्ता आहे ॥ १३-१४ ॥

**एकाच तत्त्वामध्ये दोन विरोधी लक्षणे कशी झाली ?**

अनेक विरोधी भाव त्या एकातच सामावले जातात आणि त्यांच्यात विरोध राहत नाही, कारण की, स्थावर जंगम इत्यादी सर्व प्राण्यांच्या-

---

* त्या तत्त्वाला सत् असत् म्हणू शकत नाही. कारण की, असत्च्या भावाशिवाय (सत्तेशिवाय) 'सत्' शब्दाचा प्रयोग होत नाही. पण असत्चा तर अत्यन्त अभाव आहे. म्हणून त्या परमात्मतत्त्वाला 'सत्' सुद्धा म्हणू शकत नाही. त्या परमात्मतत्त्वाचा केव्हा अभाव होतच नाही. म्हणून त्याला 'असत्' सुद्धा म्हणू शकत नाही, तात्पर्य हे आहे की त्या तत्त्वामध्ये सत्-असत् शब्दाची अर्थात् वाणीची प्रवृत्ती होतच नाही. असे ते निरपेक्ष परमात्मतत्त्व आहे.

बाहेरसुद्धा तोच आहे आणि आंतसुद्धा तोच आहे. अर्थात् त्याच्याशिवाय दूसरी कोणतीहि सत्ताच नाही. अती दूरसुद्धा तोच आहे आणि अती जवळसुद्धा तोच आहे.* तो फारच सूक्ष्म असल्यामुळे अविज्ञेय आहे म्हणजे इंद्रिये आणि अन्तःकरणाचा विषय नाही. त्यामुळे त्यांत विरोध नाही. ॥ १५ ॥

**भगवन्! त्यामध्ये विरोध न होण्याचे आणखी काय कारण आहे?**

तो परमात्मा विभागरहित असूनसुद्धा अनेक विभागवान प्राण्यांमध्ये (वस्तूंमध्ये) विभक्ताप्रमाणे स्थित आहे. तो परमात्माच सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा, त्यांचे भरण पोषण आणि संहार करणारा आहे. अर्थात् उत्पत्तिरूप, स्थितिरूप आणि प्रलयरूपसुद्धा तोच आहे. त्या परमात्म्याला ओळखले पाहिजे. ॥ १६ ॥

**त्याचे स्वरूप काय आहे?**

इंद्रियें, मन, बुद्धी इत्यादीकडून जेवढे ज्ञान होत असते. ते सर्व त्याच्यापासूनच प्रकाशित होत असते. म्हणून तो सर्व ज्योतींचा (ज्ञानांचा) सुद्धा ज्योती (प्रकाशक) आहे. त्याच्यामध्ये अज्ञानाचा अत्यन्त अभाव आहे. तो ज्ञानस्वरूप आहे. जाणण्यास योग्यसुद्धा आहे तो ज्ञानाने

---

* दूर आणि जवळ तीन प्रकाराने होत असते (१) देशकृत (२) कालकृत आणि (३) वस्तुकृत (१) देशकृत—अती दूर देशामध्येसुद्धा तोच आहे आणि अतीजवळ देशामध्येसुद्धा तोच आहे (२) कालकृत—सर्वांत अगोदर तोच होता. सर्वांच्यामागे सुद्धा तोच राहील आणि आतासुद्धा तोच आहे (३) वस्तुकृत—सर्व वस्तूंच्या अगोदर सुद्धा तोच आहे. वस्तूंच्या अंतामध्येसुद्धा तोच आहे आणि वस्तूंच्या रूपामध्येसुद्धा तोच आहे. म्हणून तो अतीदूर आणि अतीजवळ आहे. हा श्लोक या प्रकरणाचे सार आहे. या श्लोकाच्या विषयाला योग्य प्रकारे जाणल्यानंतर, याच्या भावाचे मनन केल्यानन्तर मनुष्य स्वेच्छेने व्यवहारात राहो का एकान्तात राहो, या भावाची जागृती त्याच्यामध्ये स्वयं परिश्रम, उद्योग केल्याशिवायसुद्धा राहील.

(साधन-समुदायाने) प्राप्त करण्यास योग्य आहे. तो सर्वांच्या हृदयांत विराजमान आहे* ॥ १७ ॥

**भगवन्ता ! आणखी दुसरे कोणा-कोणाला जाणायचेआहे आणि जाणण्याचे काय माहात्म्य आहे ?**

क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय, या तिघांना जाणायचे आहे. ज्यांचे वर्णन मी संक्षिप्तरूपाने केले आहे. या तिघांना योग्य प्रकारे जाणून घेणारा माझा भक्त माझ्या भावास प्राप्त होतो अर्थात् त्याला मजबरोबर अभिन्नतेचा अनुभव येतो. ॥ १८ ॥

**भक्त तर क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय या तीनही प्रकारांना जाणून आपणाकडून अभिन्नतेचा अनुभव करून घेतो पण जो साधक केवळ ज्ञानमार्गानेच चालू इच्छितो. त्याच्याकरिता काय जाणणे आवश्यक आहे ?**

त्याच्याकरिता प्रकृति (क्षेत्र) आणि पुरुष (क्षेत्रज्ञ) या दोघाना वेगळे वेगळे जाणून घेणे आवश्यक आहे. प्रकृती आणि पुरुष हे दोन्हीही अनादी आहेत.

**जर हे दोन्हीही अनादी आहेत. तरमग हे गुण आणि विकार कोणासून उत्पन्न झाले ?**

गुण आणि विकार प्रकृतीपासून उत्पन्न होतात. यांच्याशिवाय कार्य, करण आणि कर्तेपनामध्येसुद्धा प्रकृतीच हेतू आहे.

**महाराज ! पुरुष कशामध्ये हेतू असतो ?**

पुरुष तर सुखदु:खांच्या भोक्तेपनात हेतू असतो. ॥ १९-२० ॥

**पुरुष भोक्तेपनात हेतू केव्हा बनत असतो ?**

---

* या अध्यायाच्या तेराव्या श्लोकांमध्ये विराटरुपाचे आणि या श्लोकामध्ये ज्योतिस्वरूप, प्रकाशस्वरूप परमात्म्याचे वर्णन आहे.

प्रकृतीमध्ये स्थित झाल्यामुळे, तिच्याबरोबर आपला संबंध मानल्यामुळेच पुरुष गुणांचा भोक्ता बनत असतो आणि गुणांचा संग होण्यामुळेच तो उच्च-नीच योनीमध्ये जन्म घेत असतो. ॥ २१ ॥

**भगवन् ! त्या पुरुषाचे स्वरूप काय आहे ?**

तो पुरुष प्रकृतीचे कार्य अशा शरीराबरोबर संबंध ठेवल्यामुळे 'उपद्रष्टा', त्याच्या बरोबर मिसळून सम्मति देत असल्यामुळे 'अनुमन्ता', आपणास त्याचे भरण पोषण करणारा मानण्यामुळे 'भर्ता', त्याच्या संगतीने सुख-दुःख भोगण्यामुळे 'भोक्ता', आणि आपणास त्याचा मालक मानल्यामुळे 'महेश्वर' होत असतो. परन्तु स्वरूपानें तो पुरुष 'परमात्मा' म्हटला जातो. तो या शरीरात राहत असूनसुद्धा वस्तुतः शरीरसंबंधापासून रहितच आहे. ॥ २२ ॥

**अशाप्रकारे प्रकृति आणि गुणरहित पुरुषाच्या स्वरूपास जाणल्यामुळे काय होत असते ?**

अशाप्रकारे गुणांसह प्रकृतीस आणि पुरुषास जो मनुष्य योग्य प्रकारे जाणतो. त्याचा सर्वप्रकारे शास्त्रविहित कर्तव्यकर्म करूनसुद्धा पुन्हा जन्म होत नाही. अर्थात् तो जन्म-मरणापासून मुक्त होतो. ॥ २३ ॥

**त्या पुरूषाला जाणण्याचा आणखीहि दुसरा कोणता उपाय आहे काय ?**

होय आहे. काही लोक ध्यानयोगाच्या द्वारा, काही सांख्ययोगाच्या द्वारा आणि काही कर्मयोगाच्या द्वारा आपल्या चित्तात आपल्या स्वरूपाला जाणून घेतात. ॥ २४ ॥

**आणखीही दुसरा एखादा सरळ उपाय आहे काय ?**

होय, आहे जे मानव ध्यानयोग, सांख्ययोग इत्यादी साधनांना जाणत नाहीत, केवल जीवन्मुक्त महापुरुषांच्या आज्ञेमध्ये तत्पर असतात. ते-सुद्धा मृत्यूपासून तरून जातात अर्थात् मुक्त होतात. ॥ २५ ॥

**भगवन्ता ! ते मृत्यूपासून कसे तरून जातात ?**

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! स्थावर आणि जंगम जेवढे प्राणी उत्पन्न होत असतात, ते सर्व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या मानलेल्या संयोगापासूनच उत्पन्न होत असतात, असे तू समज. म्हणून क्षेत्राबरोबर आपला संयोग न मानल्यामुळे ते तरून जात असतात, जन्म मरणापासून मुक्त होतात. ॥ २६ ॥

**या संयोगापासून सुटण्याकरिता मनुष्याला काय केले पाहिजे ?**

दोन गोष्टी केल्या पाहिजेत. स्वतःसिद्ध असणाऱ्या परमात्म्याचा संबंध ओळखणे आणि प्रकृतीचा (शरीराचा) संबंध तोडणे.विषम संसारात जो समरूपाने स्थित आहे आणि नष्ट होणारांमध्ये जो अविनाशीरूपाने स्थित आहे तसेच जो परम ईश्वर आहे अशाप्रकारे आपल्या परमस्वरूपाला जो पाहतो, तो वास्तविक बरोबर पाहत असतो. अर्थात् त्याला वास्तविक स्वरूपाचा अनुभव येतो. सर्व ठिकाणी समानरूपाने परिपूर्ण असलेल्या परमात्म्याबरोबर एकता होण्यामुळे शरीराबरोबर तादात्म्याचा अभाव होतो . मग तो आपल्याकडून आपली हत्या करीत नाही. अर्थात् शरीराच्या मरण्यामुळे आपले (आत्म्याचे) मरण मानत नाही.म्हणून तो परमगतीस (परमात्म्यास) प्राप्त होतो. ॥ २७-२८ ॥

**आपण परमात्म्याच्या संबंधाला ओळखण्याची गोष्ट तर सांगितली, आता हे सांगा की प्रकृतीचा (शरीराचा) संबंध कसा तोडावा ?**

सर्व क्रिया प्रकृतीच्या द्वाराच होत असतात. असा ठीक बोध झाल्यामुळे तो आपणामध्ये कर्तृत्वाच्या अभावाचा अनुभव करीत असतो तसेच ज्यावेळी तो सर्व प्राण्यांच्या वेगळ्या वेगळ्या भावांना (शरीरांना) एका प्रकृतीमध्येच स्थित आणि प्रकृतीपासून उत्पन्न झालेले पाहतो त्यावेळी तो ब्रह्मपदाला प्राप्त होतो. मग त्याचा प्रकृतीबरोबर संबंध राहत नाही. ॥ २९-३० ॥

**असे का होत असते ?**

हे कुन्तीनंदन अर्जुना ! हा पुरुष स्वतः अनादी आणि गुणरहित असल्यामुळे स्वतः अविनाशी परमात्मस्वरूप आहे. हा शरीरात राहत असूनसुद्धा वस्तुतः काही करीत नाही आणि लिप्त होत नाही. अर्थात् हा कर्ता आणि भोक्ता नाही. ॥ ३१ ॥

**हा लिप्त कसा होत नाही ?**

ज्याप्रमाणे आकाश सर्वत्र व्याप्त असूनसुद्धा अत्यन्त सूक्ष्म असल्यामुळे कोणत्याही वस्तू, व्यक्ती इत्यादीमध्ये कधी लिप्त होत नाही. अशाचप्रकारे हा पुरुष सर्व ठिकाणी परिपूर्ण असूनसुद्धा कोणत्याही शरीरामध्ये किंचित्सुद्धा लिप्त होत नाही. ॥ ३२ ॥

**भगवन्ता ! हा पुरुष कर्ता कसा बनत नाही ?**

हे भारता ! जसा एकच सूर्य सर्व विश्वाला प्रकाशित करीतो, पण त्याच्यामध्ये प्रकाशित करण्याचे कर्तृत्व येत नाही, अशाचप्रकारे हा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला प्रकाशित करीतो. पण त्याच्यामध्ये कर्तृत्व येत नाही, तर फक्त प्रकाशमात्रच राहतो. अशाप्रकारे जे ज्ञानरूपी नेत्रानें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या भेदाला, तसेच प्रकृती आणि तिच्या कार्यापासून आपणाला वेगळे जाणतात—असा अनुभव करीतात, ते परमात्म्याला प्राप्त होतात. ॥ ३३-३४ ॥



# अध्याय चवदावा

भगवान श्रीकृष्ण म्हणाले, ज्याला जाणल्यामुळे सर्वच्या सर्व मननशील माणसे परमसिद्धीला प्राप्त झाले आहेत. आता सर्व ज्ञानांमध्ये उत्तम आणि परम असणारे ते ज्ञान मी तुला पुन्हा सांगेन. ॥ १ ॥

**भगवन्ता ! त्या ज्ञानाचा आणखी काय महिमा आहे ?**

त्या ज्ञानाचा आश्रय घेऊन जे मानव माझ्या साधर्म्यास प्राप्त झाले आहेत अर्थात् माझ्यासारखे झाले आहेत. ते महासर्गाच्या वेळी सुद्धा उत्पन्न होत नाहीत आणि महाप्रळयाच्यावेळीसुद्धा व्यथित होत नाहीत . ॥ २ ॥

**महासर्गामध्ये प्राणी कसे उत्पन्न होत असतात ?**

हे भारता ! माझी मूळ प्रकृती तर उत्पत्तिस्थान आहे आणि मी तिच्यामध्ये जीवरूप (चेतनरूप) गर्भ स्थापन करीत असतो. ज्यामुळे सर्व प्राणी उत्पन्न होतात. म्हणून हे कुन्तीपुत्रा अर्जुना ! वेगळ्या-वेगळ्या योनीमध्ये जेवढे काही प्राणी उत्पन्न होतात, त्यांच्या सर्वांच्या उत्पत्तीमध्ये जननीच्या स्थानी माझी मूळ प्रकृती आहे आणि बीज स्थापन करण्यामध्ये जनकाच्या स्थानी मी आहे. * ॥ ३-४ ॥

**आपण सर्व जीवांचे पिता आहात, तर मग ते जीव बंधनात का पडतात ?**

हे महाबाहो ! सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण तर प्रकृतीपासूनचतर

---

* महासर्गाच्या आरंभी जीवांचा (आपल्या आपल्या गुण, कर्म आणि स्वभावाच्या अनुसार) प्रकृतीबरोबर विशेष संबंध करून देणेच भगवंताकडून बीज स्थापन करणे आहे.

उत्पन्न होतात, पण यांचा संग केल्यामुळे हे अविनाशी आत्म्याला देहात बांधत असतात. ॥ ५ ॥

**भगवन्ता ! सत्त्वगुणाचे काय स्वरूप आहे आणि तो जीवात्म्याला देहामध्ये कसा बांधतो ?**

हे निष्पाप अर्जुना ! त्या तिन्ही गुणांपैकी सत्त्वगुण स्वरूपाने तर निर्मळ असल्यामुळे प्रकाशक आणि निर्विकार आहे. परंतु तो सुख आणि ज्ञानाच्या आसक्तींनि जीवात्म्याला देहामध्ये बांधत असतो. ॥ ६ ॥

**रजोगुणाचे काय स्वरूप आहे आणि तो जीवात्म्याला कसा बद्ध करीत असतो !**

हे कुन्तीनंदना ! तृष्णा आणि आसक्तीला उत्पन्न करणाऱ्या रजोगुणाला तू रागस्वरूप (आसक्तीरूप) समज. तो कर्मांच्या आसक्तीमुळे जीवात्म्याला देहामध्ये बद्ध करीत असतो. ॥ ७ ॥

**तमोगुणाचे काय स्वरूप आहे आणि तो जीवात्म्याला कसा बद्ध करीत असतो ?**

हे भरतवंशातील अर्जुना ! तमोगुण अज्ञानामुळे उत्पन्न होतो. आणि सर्व प्राण्यांना मोहित करणारा आहे. तो प्रमाद, आळस आणि झोप यांच्याद्वारा जीवात्म्याला देहामध्ये बद्ध करीत असतो. ॥ ८ ॥

**भगवन्ता ! बद्ध करण्याअगोदर हे तीन गुण काय करीत असतात ?**

हे भारता ! सत्त्वगुण तर सुखात ठेवून मनुष्यावर आपला अधिकार जमवित असतो, रजोगुण कर्मामध्ये लावून मनुष्यावर आपला अधिकार जमवित असतो आणि तमोगुण ज्ञानाला झांकून तसेच प्रमादामध्ये लावून मनुष्यावर आपला अधिकार जमवित असतो. ॥ ९ ॥

**भगवन् ! तीन गुणांपेकी एक-एक गुण मनुष्यावर आपला अधिकार कसा जमवित कसतो ?**

हे भरतवंशातील अर्जुना! रजोगुण आणि तमोगुणाला दाबून सत्त्वगुण वाढत असतो, सत्त्वगुण आणि तमोगुणाला दाबून रजोगुण वाढत असतो. तसेच सत्त्वगुण आणि रजोगुणाला दाबून तमोगुण वाढत असतो . ॥ १० ॥

**वाढलेल्या सत्त्वगुणाची काय लक्षणे असतात ?**

जेव्हा या शरीरात सर्व इंद्रिये व अन्तःकरणाची स्वच्छता आणि जाणण्याची शक्ती विकसित होत असते. तेव्हा ओळखावे की, सत्त्वगुण वाढलेला आहे. ॥ ११ ॥

**भगवन् ! वाढलेल्या रजोगुणाची काय लक्षणे असतात ?**

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! जेव्हा अन्तःकरणात धनादिकांचा लोभ, कर्म करण्याची प्रवृत्ती, भोग आणि संग्रहाच्या उद्देशाने नवीन नवीन कर्मांची सुरूवात करणे, अशान्ती, इच्छा इत्यादी वृत्ती वाढतात, तेव्हा ओळखावे की, रजोगुण वाढलेला आहे. ॥ १२ ॥

**वाढलेल्या तमोगुणाची काय लक्षणे असतात ?**

हे कुरुनन्दना! जेव्हा इंद्रिये आणि अन्तःकरणात स्वच्छता (समजण्याची) शक्ती राहत नाही, कोणतेही कार्य करण्यास मन तयार होत नाही, मनुष्य हा करण्यायोग्य काम करीत नाही. तसेच करण्यास अयोग्य अशा कामात लागत असतो, अन्तःकरणामध्ये मोह पसरलेला राहतो, तेव्हा अशा वृत्ती वाढल्यावर समजावे की, तमोगुण वाढलेला आहे. ॥ १३ ॥

**गुणांच्या तात्कालिक वाढण्यामुळे जर कोणी मनुष्य मेला, तर त्याची काय गती होत असते ?**

सत्त्वगुणाच्या वाढण्यामुळे मरणारा मनुष्य पुण्यात्म्यांकडून प्राप्त करण्यास योग्य अशा निर्मळ (उत्तम) लोकात जातो, रजोगुणाच्या वाढण्यामुळे मरणारा मनुष्ययोनीमध्ये जन्म घेतो आणि तमोगुणाच्या वाढण्यामुळे मरणारा पशु-पक्षी इत्यादी मूढ योनीमध्ये जन्म घेतो

**भगवन् ! या गुणांपासून अशा गती कां होत असतात ?**

कारण की, गुणांच्या वृत्ती जशा असतात, तसेच कर्म होते. म्हणून सात्त्विक कर्माचे फळ निर्मळ असते, राजस कर्माचे फळ दुःख असते आणि तामस कर्माचे फळ अज्ञान (मूढता) असते. तात्पर्य हे आहे की, जसे सात्त्विक इत्यादी गुणांच्या वृत्तींचे फळ असते, तसेच सात्त्विकादी कर्मांचेसुद्धा फळ असते, ॥ १६ ॥

**वृत्ती आणि कर्मांच्या मूळात काय आहे ?**

हे तीन गुण आहेत, सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते, रजोगुणापासून लोभ उत्पन्न होतो आणि तमोगुणापासून प्रमाद, मोह तसेच अज्ञान उत्पन्न होते. ॥ १७ ॥

**भगवन् ! या तीन गुणांमध्ये स्थित राहणारांची काय गती होते ?**

सत्त्वगुणामध्ये स्थित राहणारे स्वर्गादि उच्च लोकांमध्ये जातात, रजोगुणामध्ये स्थित राहणारांचा मनुष्यलोकामध्ये जन्म होतो आणि निन्दनीय तमोगुणामध्ये स्थित राहणारे नरकादिकांमध्ये जातात. ॥ १८ ॥

**तर मग आपणास कोण प्राप्त करीत असतो ?**

जो यावत् कर्माच्या होण्यामध्ये गुणांच्याशिवाय दुसऱ्यास कर्ता पाहत नाही आणि आपण गुणांपासून अतीत आहोत असा अनुभव करीत असतो, तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो तसेच तो विवेकी मनुष्य देहाला उत्पन्न करणा-यां या तीन गुणांचे अतिक्रमण करून जन्म, मृत्यू आणि वृद्धावस्था-रूप दुःखापासून मुक्त होऊन अमरतेचा अनुभव घेतो. ॥ १९-२० ॥

**अर्जुन म्हणाला—हे प्रभो ! या तीन गुणांच्या अतीत झालेला मनुष्य कोणत्या लक्षणांनी युक्त असतो ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—हे पाण्डवा ! सत्त्वगुणाची 'प्रकाश', रजोगुणाची 'प्रवृत्ती' आणि तमोगुणाची 'मोह' या तीनही वृत्ती आल्यावर

तो त्यांचा द्वेष करीत नाही आणि त्यांच्या न येण्यामुळे त्यांची इच्छा करीत नाही, जो उदासीनाप्रमाणे राहतो, गुणांकडून विचलित केला जाऊ, शकत नाही, तसेच गुणच गुणांमध्ये वर्तत राहतात, असा अनुभव करीत असता आपल्या स्वरूपातच स्थित राहत असतो आणि स्वतः क्रियारहित असतो.

**भगवन्ता ! गुणातीत मनुष्याचे आचरण कसे असते ?**

त्याचे आचरण समतापूर्वक असते.जो धैर्यवान मनुष्य आपल्या स्वरूपांत सतत स्थित राहतो. तसेच सुख-दुःखामध्ये, मातीचे ढेकुळ दगड आणि सोन्यामध्ये, शरीर, इंद्रियें इत्यादींच्या प्रिय-अप्रियमध्ये, नांवाच्या निंदा-स्तुतीमध्ये, शरीराच्या मान-अपमानामध्ये, शत्रु-मित्राच्या पक्षामध्ये सम राहतो आणि जो कामना, आसक्तीला घेऊन कोणतेही नवीन कर्म सुरू करीत नाही, तो गुणातीत म्हटला जातो.

**गुणातीत होण्याचा उपाय काय आहे ?**

जो मनुष्य अव्यभिचारी (अनन्य) भक्तियोगाने माझेच भजन करीत असतो, तो या तीन गुणांचे अतिक्रमण करून ब्रह्मप्राप्तीकरिता पात्र होतो. ॥ २१—२६ ॥

**भक्ती तर आपली करणार आणि पात्र होणार ब्रह्मप्राप्तीचा, भगवन्ता ! हे कसे ?**

अरे भैया ! ब्रह्म, अविनाशी अमृत, सनातन धर्म आणि ऐकान्तिक सुखाचा आश्रय मीच आहे, अर्थात् ही सर्व माझीच नावे आहेत.



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय पंधरावा

**हे भगवन्! ब्रह्म, अविनाशी अमृत इत्यादीकांचा आधार (आश्रय) आपण आहात, तर मग या संसाराचा आधार कोण आहे ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—या संसाररूपी वृक्षाचा आधार, आश्रय मीच आहे, हा वृक्ष वरच्या बाजूला मूळ असणारा तसेच खालच्या बाजूला फांद्या असणारा आहे. उद्यापर्यंतसुद्धा स्थिर राहत नसल्यामुळें याला 'अश्वत्थ' म्हणतात, याच्या आरंभाचा आणि शेवटाचा पत्ता नसल्यामुळे तसेच सतत प्रवाहरूप राहत असल्यामुळे याला 'अव्यय' म्हणतात. वेदांमध्ये आलेले सकाम अनुष्ठानांचे वर्णन याची पाने सांगितलेली आहेत. अशा संसारवृक्षाला जो यथार्थरूपाने जाणतो, तोच वास्तविक यथार्थरूपाने वेदांच्या तत्त्वाला जाणणारा आहे. ॥ १ ॥

**भगवन्ता ! हा संसारवृक्ष आणखी कसा आहे ?**

या संसारवृक्षाच्या सत्त्व, रज आणि तम या तीन्ही गुणांकडून वाढलेल्या फांद्या खाली, मध्यभागी आणि वरच्या सर्व लोकांमध्ये पसरलेल्या आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध—हे पाच विषय ह्या वृक्षाच्या फांद्यांचे अंकुर आहेत, (या विषयांचे चिन्तन करणेच नवीन-नवीन अंकुरांचे निघणे आहे.) परन्तु ह्या वृक्षाच्या फांद्यांचे मूळ हा मनुष्यलोकच आहे. कारण की ह्या मनुष्यलोकामध्ये केलेल्या कर्मांचे फळच सर्व लोकांमध्ये भोगले जाते. ॥ २ ॥

**या वृक्षाचे स्वरूप काय आहे ?**

या संसारवृक्षाचे जसे सत्य आणि सुंदर—सुखकारक रूप लोकांना दिसण्यात येते, तसे रूप विचार केल्यानंतर मिळत नाही, याला तर आरंभ नाही, शेवट नाही आणि स्थितीही नाही.

**तर मग त्याचा सम्बन्ध तोडण्याकरिता मनुष्याने काय केले पाहिजे ?**

तादात्म्य, ममता आणि कामनारूपी फांद्यांची दृढ मूळे असणाऱ्या संसारवृक्षाला असंगतारूप शस्त्राने कापून त्या परमपद परमात्म्याचा शोध केला पाहिजे,

**भगवन्ता ! शोध करू शकलो नाही तर काय करावे ?**

ज्याला प्राप्त झाल्यानंतर मनुष्य पुन्हा फिरून संसारात येत नाही आणि ज्याच्यामुळे अनादिकाळापासून ही सृष्टी पसरलेली आहे. त्या आदिपुरुष परमात्म्याला शरण गेले पाहिजे. ॥ ३-४ ॥

**शरण गेल्यामुळे काय होईल ?**

शरण येणारे मानव मान आणि मोहापासून रहित होतात. आसक्ती न राहिल्यामुळें त्यांच्यामध्ये ममता इत्यादी दोष राहत नाहीत, ते सतत परमात्म्यामध्येच स्थित राहतात ते सर्व कामनांपासून रहित असतात, ते सुखदुःरूपी द्वन्द्वांपासून रहित होऊन अविनाशी पदाला प्राप्त होतात. ॥ ५ ॥

**भगवन् ! ते अविनाशी पद कसे आहे ?**

सूर्य, चन्द्र आणि अग्नी ज्याला प्रकाशित करू शकत नाहीत. तसेच जेथे गेल्यानंतर मनुष्य पुन्हा संसारात येत नाही. ते अविनाशी पदच माझे परमधाम आहे. ॥ ६ ॥

**पुन्हा फिरून संसारामध्ये का येत नाहीत ?**

या शरीरात जीव बनलेला हा आत्मा (जीवात्मा) कायमचा माझाच अंश आहे, म्हणून मला प्राप्त झाल्यावर हा पुन्हा फिरून संसारात येत नाही. परंतु याच्याकडून ही चूक होत असते की हा प्रकृतीचे कार्य असणाऱ्या इंद्रियांना आणि मनाला आपले मानत असतो. ॥ ७ ॥

**इंन्द्रिये इत्यादींना आपले मानण्यामुळे काय होत असते ?**

ज्याप्रमाणे वारा गंध उत्पन्न होणाऱ्या ठिकाणाहून गंधाचे ग्रहण करून घेऊन जातो, त्याचप्रमाणे शरीर, इंद्रिये इत्यादींचा मालक बनलेला जीवात्मासुद्धा ज्या शरीराला सोडत असतो, तेथून मनासह इंद्रियांचे ग्रहण करून पुन्हा ज्या शरीराला प्राप्त होतो त्या शरीरांत जातो. अर्थात् मरत-जन्मत राहतो. ॥ ८ ॥

**भगवन् ! तो तेथे काय करीत असतो ?**

तेथे तो मनाचा आश्रय घेऊन कान, त्वचा, डोळे, रसना आणि नाक या पाच इंद्रियांद्वारा शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध या पाच विषयांचे सेवन करीत असतो. ॥ ९ ॥

**आसक्तीपूर्वक विषयांचे सेवन करण्याने काय होत असते ?**

गुणांनी युक्त होऊन जन्मतेवेळी-मरतेवेळी आणि भोगांना भोगतेवेळीही जीवात्मा स्वरूपाने निर्लिप्तच राहत असतो. परंतु आसक्ती-पूर्वक विषयांचे सेवन करणारे मूर्ख मनुष्य याप्रमाणे जाणत नाहीत.

**तर मग कोण जाणत असतो ?**

ज्ञानरूपी नेत्र असणारे विवेकी मनुष्यच जाणतात . ॥ १० ॥

**भगवन्ता ! ज्ञानरूपी नेत्र कोणाचे उघडतात आणि कोणाचे उघडत नाहीत ?**

ज्यांनी आपले अंतःकरण शुद्ध केले आहे. अर्थात् नित्यप्राप्तास महत्त्व दिले आहे. असे यत्नशील योगी लोक तर आपल्यामध्ये स्थित असलेल्या तत्त्वाला ओळखत असतात अर्थात् त्यांचे तर ज्ञाननेत्र उघडतात, पण ज्यांनी आपले अंतःकरण शुद्ध केले नाही, असे अविवेकी मानव प्रयत्न करूनसुद्धा या तत्त्वाला ओळखत नाहीत अर्थात् त्यांचे ज्ञाननेत्र उघडत नाहीत. ॥ ११ ॥

**आपले-आपल्यामध्ये स्थित तत्त्व काय आहे ?**

मीच आहे.सूर्यामध्यें आलेले जे तेज सर्व जगताला प्रकाशित करते आणि जे तेज चन्द्रामध्ये आहे तसेच जे तेज अग्नीमध्ये आहे. ते तेज तू माझेच समज. तात्पर्य हे आहे की, सूर्य, चन्द्र आणि अग्नी यांच्यामध्ये मीच तेजरूपाने स्थित होऊन सम्पूर्ण जगताला प्रकाशित करीत असतो. ॥ १२ ॥

**भगवान्! आपण आणिक काय करीत असता ?**

मीच पृथ्वीमध्यें प्रवेश करून आपल्या शक्तीने सर्व प्राण्यांना धारण करतो आणि मीच रसमय चन्द्रमा होऊन सर्व वनस्पतींना पुष्ट करीत असतो. ॥ १३ ॥

**आपण आणिक काय काम करीत असतां ?**

प्राण्यांच्या शरीरात राहणारा मीच प्राण-अपानाने युक्त वैश्वानर (जठराग्नी) बनून प्राण्यांकडून खाल्ले गेलेल्या चार प्रकारच्या (भोज्य, पेय, चोष्य, लेह्य) अन्नाचे पचन करीत असतो. ॥ १४ ॥

**आणिक आपली काय विलक्षणता आहे ?**

मीच सर्वांच्या हृदयांत राहतो. माझ्यामुळेच स्मृती, ज्ञान आणि अपोहन (संशय इत्यादी दोषांचा नाश) होते. सर्व वेदांच्या द्वारे मीच जाणण्यास योग्य आहे. वेदांच्या तत्त्वाचा निर्णय करणारा आणि वेदांना जाणणारासुद्धा मीच आहे. ॥ १५ ॥

**आपण ज्यांच्या हृदयात विराजमान आहात, ते सर्व कोण आहेत ?**

ह्या मानवलोकामध्ये क्षर (विनाशी) आणि अक्षर (अविनाशी) हे दोन प्रकारचे पुरुष आहेत. यांच्यामध्ये सर्व प्राण्यांची शरीरे विनाशी आणि जीवात्मा अविनाशी म्हटला जातो. ॥ १६ ॥

**क्षर आणि अक्षर यांच्याशिवाय आणखीहि कोणी आहे. ?**

क्षर आणि अक्षर यांच्यापेक्षा अन्य असा उत्तम पुरुष आहे. जो जगतामध्ये परमात्मा नावाने म्हटला गेलेला आहे आणि जो त्रैलोक्याचे भरण-पोषण करणारा अविनाशी ईश्वर आहे॥ १७॥

**भगवन्ता ! उत्तम पुरुष तर अन्य (दुसरा) आहे. पण आपण कोण आहात ?**

अरे भैय्या ! तो उत्तम पुरुष मीच आहे. मी क्षरापासून तर वेगळा आहे आणि अक्षरापेक्षाही उत्तम आहे. म्हणून लोकामध्ये आणि वेदामध्ये मी पुरुषोत्तम नावाने प्रसिद्ध आहे. ॥ १८॥

**भगवन्ता ! आपण पुरुषोत्तम नावाने प्रसिद्ध आहात. तर याच्यापासून मानवाला काय लाभ आहे ?**

हे भारता ! मोहरहित झालेला जो भक्त मला पुरुषोत्तम अशाप्रकारे जाणतो तो सर्वज्ञ होतो. अर्थात् त्याच्याकरिता स्वतःसाठी काहीही प्राप्त करणे शिल्लक राहत नाही. मग तो सर्वप्रकारे केवळ माझेच भजन करीत असतो अर्थात् त्याचे मन माझ्यामध्येच लागलेले असते. ॥ १९ ॥

**भगवन्ता ! जर अशीच गोष्ट आहे तर सर्व आपणामध्येच का लागत नाहीत ?**

हे निष्पाप अर्जुना ! मी जे शास्त्र तुला सांगितले आहे हे फारच गोपनीय शास्त्र आहे, याला जाणून माझा भक्त ज्ञात-ज्ञातव्य, कृतकृत्य आणि प्राप्त-प्राप्तव्य होतो. ॥ २० ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय सोळावा

**भगवन् ! त्या अत्यन्त गोपनीय शास्त्राचा अधिकारी कोण असतो ?**

दैवी सम्पत्तिवान् असतो. *

**दैवी सम्पत्तियुक्त असणाऱ्या मनुष्याची लक्षणे काय असतात ?**

भगवान श्रीकृष्ण म्हणाले—ती लक्षणे अशाप्रकारे आहेत—

१. माझ्यावरच दृढ विश्वास ठेवून निर्भय राहणे.

२. मला प्राप्त करण्याचा अंतःकरणात एक दृढ निश्चय होणे.

३. मला तत्त्वरूपाने ओळखण्याकरिता कोणत्याही परिस्थितीत सम राहणे.

४. सात्त्विक दान देणे.

५. इंद्रियांना ताब्यात ठेवणे.

६. आपल्या कर्तव्याचे पालन करणे.

७. शास्त्रांच्या सिद्धांतांना आपल्या जीवनात उतरविणे.

८. आपल्या कर्तव्याचे पालन करताना जे कष्ट पडतील, त्यांना प्रसन्नतापूर्वक सहन करणे.

९. तन-मन-वाणीची सरळता.

१०. तन-मन-वाणीकडून कधीही कोणत्याही प्राण्याला कष्ट न देणे.

११. जसे पाहिले, ऐकले आणि ज्ञात झाले तसेच्या तसे प्रिय शब्दात सांगणे.

---

* 'देव' नाव परमात्म्याचे आहे. त्या परमात्म्याची जी सम्पत्ती आहे. गुण आहेत, तीला 'दैवीसम्पत्ती' म्हणतात. अर्थात् जे साधन परमात्म्याच्या प्राप्तीमध्ये निमित्त बनते. त्याला 'दैवी सम्पत्ती' म्हणतात.

१२. माझे स्वरूप समजून कोणावर कधी क्रोध न करणे.

१३. प्रापंचिक कामनांचा त्याग करणे.

१४. अंतःकरणात रागद्वेषजनक हालचाल न होणे.

१५. चुगली न करणे.

१६. सर्व प्राणिमात्रांवर दयाभाव ठेवणे.

१७. सांसारिक विषयांत आकर्षीत न होणे.

१८. हृदय कोमल होणे.

१९. अकर्तव्य करण्यामध्ये लाज वाटणे.

२०. उतावळेपणा नसणे.

२१. शरीर आणि वाणीमध्ये तेज (प्रभाव) असणे.

२२. आपल्यामध्ये दण्ड देण्याचे सामर्थ्य असूनसुद्धा अपराध्याचे अपराध माफ करणे.

२३. प्रत्येक परिस्थितीमध्ये धैर्य राखणे.

२४. शरीराची शुद्धता राखणे.

२५. बदला घेण्याची भावना उत्पन्न न होणे.

२६. आपल्यामध्ये श्रेष्ठतेची भावना नसणे.

हे भरतवंशातील अर्जुना । ही सर्व दैवी सम्पत्ती प्राप्त झालेल्या मनुष्याची लक्षणे आहेत. अर्थात् ह्या लक्षणांनी युक्त असणाराला माझ्या भक्तीचा अधिकारी मानले पाहिजे.* ॥ १—३ ॥

* येथे ही शंका येते की, जे अशा लक्षणांनी युक्त आहेत. ते तर भक्तीचे अधिकारी आहेत. परन्तु ज्यांच्यामध्ये अशी लक्षणे नाहीत ते दुराचारी मानव तर भक्तीचे अधिकारी होऊच शकत नाहीत? गोष्ट तर बरोबर आहे. परन्तु जर कोणी दुराचारी मनुष्यसुद्धा अनन्यभावाने भगवंताच्या भक्तीला लागला तर तो फारच लवकर धर्मात्मा होतो. अर्थात् त्याच्यामध्ये भगवंताच्या कृपेने दैवी सम्पत्तीची लक्षणे फारच लवकर येतात. (गीता ९।३०-३१)

**भगवन्ता ! अनधिकारी कोण असतो ?**

आसुरी सम्पत्तिवान* .

**आसुरी सम्पत्तीने युक्त असणाऱ्या मनुष्याची काय लक्षणे असतात ?**

ती अशाप्रकारे आहेत—

१. दम्भ (दिखावूपणा) करणे.

२. घमंड करणे म्हणजे ममतायुक्त वस्तूंच्या अनुषंगाने आपल्यामध्ये मोठेपणाचा अनुभव करणे.

३. अहंतायुक्त वस्तूंच्या अनुषंगाने अभिमान करणे.

४. क्रोध करणे.

५. मन, वाणी आणि वर्तन इत्यादिमध्ये कठोरता ठेवणे.

६. सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्य इत्यादिच्या ज्ञानाला (विवेकाला) महत्त्व न देणे.

हे अर्जुना ! ही सर्व आसुरी सम्पत्तीला, प्राप्त झालेल्या मनुष्याची लक्षणे आहेत. अर्थात् या लक्षणांनी युक्त असणारा मनुष्य माझ्या भक्तीचा अधिकारी नसतो. ॥ ४ ॥

**भगवन्ता ! ह्या दैवी आणि आसुरी सम्पत्तीचे काय फळ असते ?**

दैवी सम्पत्ती मुक्ती देणारी आणि आसुरी संपत्ती बद्ध करणारी असते. परन्तु हे पांडवा ! तुला शोक (चिन्ता) करण्याची जरूरी नाही. कारण की, तू दैवी सम्पत्तीला प्राप्त झालेला आहेस. ॥ ५ ॥

---

* 'असु' नांव प्राणांचे आहे. त्या प्राणांमध्येच जो रमण करू इच्छितो, प्राणांचेच रक्षण इच्छितो. त्यांना 'असुर' म्हणतात. तात्पर्य हे आहे की, शरीराबरोबर एकता मानून 'मी कधी मरू नये, सदा जिवंत रहावे आणि सुख भोगीत रहावे' अशी इच्छा करणारा मनुष्य 'असुर' होय. त्या असुरांची जी सम्पत्ती (लक्षणे) आहे, तिला आसुरी सम्पत्ती म्हणतात.

**आसुरी सम्पत्ती बन्धनकारक कशी होते ?**

ह्या लोकामध्ये दोन प्रकारच्या प्राण्यांची सृष्टी आहे. दैवी आणि आसुरी. दैवी सम्पत्ति तर मी विस्ताराने सांगितली आहे. आता हे पार्था ! तू आसुरी सम्पत्तीबद्दल विस्तारानें ऐक. आसुरी सम्पत्तीने युक्त असणारा मानव आपण कशामध्ये प्रवृत्त झाले पाहिजे आणि कशापासून निवृत्त झाले पाहिजे, याला जाणत नाहीत, तसेच त्यांच्यामध्ये बाह्य शुद्धी नसते, सदाचार नसतो आणि सत्यपालनसुद्धा नसते. ॥ ६-७ ॥

**भगवन् ! त्यांच्यामध्ये बाह्य शुद्धी इत्यादी का नसतात ?**

त्यांची दृष्टीच विपरीत असते.ते हेच म्हणत असतात की, हे जगत् असत्य आहे अर्थात् याच्यामध्ये कोणतीही गोष्ट (शास्त्र, धर्म इत्यादी) सत्य नाही, ह्या जगतात धर्म-अधर्म, पुण्य-पाप इत्यादीबाबत काही मर्यादा नाही, ह्या जगताला निर्माण करणारा कोणी ईश्वर नाही, परन्तु स्त्रीला पुरूषाची आणि पुरुषाला स्त्रीची इच्छा झाली तेव्हा दोघांच्या संयोगांतून हे जगत् निर्माण झाले, म्हणून या जगताच्या उत्पत्तीचे कारण कामच आहे. याच्याशिवाय दुसरे कोणतेही कारण नाही. ॥ ८ ॥

**त्या आसुरी सम्पत्तीने युक्त असणारांचे कर्म कसे होत असते ?**

उपर्युक्त नास्तिक दृष्टीचा आश्रय घेणारे ते लोक आपल्या नित्य स्वरूपाला (आत्म्याला) मानत नाहीत, त्यांची बुद्धी तुच्छ असते, त्यांचे कर्म अत्यन्त भयानक असते, ते जगताचे शत्रू असतात. अशा मानवांचे सामर्थ्य दुसऱ्यांचा नाश करण्याकरिताच असते. ॥ ९ ॥

**नास्तिक दृष्टीचा आश्रय घेत ते काय करीत असतात ?**

ते कधीहि पूर्ण न होणाऱ्या कामनांचा आश्रय घेऊन दम्भ, अभिमान आणि मद यांच्यामध्ये मस्त असणारे तसेच अपवित्र नियमांना धारण करणारे मानव मोहामुळें अनेक दुराग्रहांचा आश्रय घेऊन जगतात वावरत असतात. ॥ १० ॥

**त्यांचे भाव कसे असतात ?**

ते मृत्यूपर्यंत राहणा-या मोठ-मोठया चिन्तेचाआश्रय घेतात. ते पदार्थांचा संग्रह आणि त्यांचा भोग घेण्यात मग्न असणारे आणि 'जे काही आहे ते एवढेच (सुख भोगणे आणि संग्रह करणे) आहे'—असा निश्चय करणारे असतात. ॥ ११ ॥

**भगवन् ! ते कोणत्या उद्देशाने चालत असतात ?**

शेकडों आशारूपी पाशांनी बांधले गेलेले ते मानव काम आणि क्रोध यांचा आश्रय घेऊन केवळ भोग भोगण्याच्या उद्देशानेच अन्यायाने धनाचा संग्रह करण्याचा प्रत्यत्न करीत राहतात. ॥ १२ ॥

**त्यांचे मनोरथ कसे असतात ?**

आज एवढे धन तर आम्ही प्राप्त केले आणि आता हे मनोरथ प्राप्त करून घेऊ, एवढे धन तर आमच्याजवळ आहेच, आणखी एवढे धन होईल. ॥ १३ ॥

**त्यांचे आणखी मनोरथ कसे असतात ?**

ह्या शत्रूला तर आम्ही मारले आणि त्या दुसऱ्या शत्रूंना सुद्धा आम्ही मारू, आम्ही सर्वसमर्थ आहोत, सिद्ध आहोत, बलवान् आहोत, सुखी आहोत आणि भोगांना भोगणारे आहोत, आम्ही मोठे धनवान आहोत, पुष्कळ लोक आम्हाला साहाय्य करणारे आहेत, आमच्यासारखा दुसरा कोण होऊ शकतो ?

आम्ही खूप यज्ञ करू, दान देऊ आणि पुन्हा मजा करू, अशाप्रकारे ते अज्ञानाने मोहित होऊन मनोरथ करीत राहतात. ॥ १४-१५ ॥

**भगवन्ता ! अशा मानवांची मरणानंतर कोणती गती होत असते ?**

वेगळ्या-वेगळ्या भ्रमामध्ये पडलेले, जाळ्यामध्ये फसलेले (अडकलेले) तसेच पदार्थांचा संग्रह आणि भोगांमध्ये आसक्त झालेले ते मानव भयंकर नरकांत पडतात. ॥ १६ ॥

**भोगांमध्ये आसक्त झालेल्या त्या आसुरी सम्पत्तीने युक्त असणाऱ्या मानवांचे पतन करणारे भाव काय असतात ?**

ते स्वतःसच पूज्य (श्रेष्ठ) मानणारे, अत्यन्त अभिमान करणारे तसेच धन आणि मान यांच्या मस्ती मग्न राहणारे असतात.

**भगवन्ता ! असे लोक शुभकर्मही तर करू शकतात ?**

होय, ते यज्ञादी शुभ कर्म तर करीत असतात.पण दम्भ (दिखावूपणा) आणि अविधिपूर्वक तसेच नाममात्र करतात. केवळ आपले नाव होण्यासाठी करतात. ॥ १७ ॥

**ते असे का करीत असतात ?**

कारण की, ते अहंकार, बळ, घमेण्ड, काम आणि क्रोधाचा आश्रय घेऊन राहत असतात.

**भगवन्ता ! त्यांचे आणिक काय भाव असतात ?**

ते मानव स्वतःच्या आणि दुसऱ्यांच्या शरीरात राहणाऱ्या मज अन्तर्यामीबरोबर द्वेष करीत असतात. तसेच माझ्या आणि दुसऱ्याच्या गुणांमध्ये दोष दृष्टी ठेवतात. ॥ १८ ॥

**भगवन् ! अशा आसुर भावांचा काय परिणाम होत असतो ?**

त्या द्वेष करणाऱ्या, क्रूर स्वभाव असणाऱ्या आणि संसारात महान नीच आणि अपवित्र असणाऱ्या मनुष्यांना मी पुन्हा पुन्हा कुत्रा, गाढव, वाघ, कावळा, घुबड, गिधाड, साप, विंचू इत्यादी आसुरी योनीमध्ये टाकीत असतो. ॥ १९ ॥

**पुन्हा काय होत असते ?**

हे कुन्तीनन्दना ! ते मूर्ख मानव मला प्राप्त न करता जन्म-जन्मान्तरात आसुरी योनीला प्राप्त होत असतात आणि पुन्हा त्याच्यापेक्षाही अधिक अधम गतीमध्ये म्हणजे भयंकर नरकामध्ये जातात. ॥ २० ॥

**भगवन्त ! त्यांचे अधम योनीमध्ये आणि गतीमध्यें (नरकांत) जाण्याचे मुख्य कारण काय आहे ?**

काम, क्रोध आणि लोभ—हे तीन प्रकारचे नरकाचे दरवाजे मानवाचे पतन करणारे आहेत, म्हणून या तीन्हींचा त्याग केला पाहिजे ॥ २१ ॥

**यांचा त्याग करण्याने काय होईल ?**

हे कुन्तीपुत्र अर्जुना ! जो मानव नरकाच्या या तीन्ही दरवाजांना विन्मुख होऊन आपल्या कल्याणाचे आचरण करीत असतो अर्थात् जो शास्त्रनिषिद्ध आचरणाचा त्याग करून केवळ आपल्या कल्याणाच्या उद्देशाने निष्कामभावपूर्वक विहित आचरण करीत असतो. तो परमगतीला प्राप्त होतो. ॥ २२ ॥

**परमगतीची प्राप्ती कोणाला होत नाही ?**

जो शास्त्रविधीचा त्याग करून आपल्या इच्छेप्रमाणे मनमानी आचरण करीत असतो.अर्थात् आपल्या मनाने ज्या कामाला चांगले समजतो, ते करीत असतो आणि ज्याला चांगले समजत नाही, ते करीत नाही, अशा मनुष्याला सिद्धी (अन्तःकरणाची शुद्धी) प्राप्त होत नाही. सुख प्राप्त होत नाही आणि परमगतीसुद्धा प्राप्त होत नाही. ॥ २३ ॥

**चांगल्या आणि वाईट कामाची ओळख कशी होईल ?**

कर्तव्य आणि अकर्तव्याच्या विषयात शास्त्रच प्रमाण आहे. असे जाणून तुला शास्त्रविधीने नियत केलेले कर्तव्यकर्मच केले पाहिजे. अर्थात् शास्त्र समोर ठेवूनच प्रत्येक काम केले पाहिजे. ॥ २४ ॥



॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अध्याय सतरावा

**अर्जुन म्हणाला.—भगवान् श्रीकृष्णा ! जे मानव शास्त्रविधीला न जाणतां श्रद्धापूर्वक यजन-पूजन करतात, त्यांची श्रद्धा सात्त्विकी असते अथवा राजसी किंवा तामसी ? ॥ १ ॥**

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:—मनुष्यांच्या स्वभावापासून उत्पन्न होणारी श्रद्धा सात्त्विकी, राजसी आणि तामसी अशी तीन प्रकारची असते. ॥ २ ॥

**ती स्वाभाविक श्रद्धा तीन प्रकारची का असते ?**

हे भारता ! सर्व मनुष्यांची श्रद्धा त्यांच्या अन्तःकरणानुरूप असते. हा मनुष्य श्रद्धामय आहे. म्हणून जो जसा श्रद्धायुक्त असतो तसेच त्याचे स्वरूप असते म्हणजे तशीच त्याची निष्ठा (स्थिती) असते. ॥ ३ ॥

**त्या श्रद्धेची (निष्ठेची) ओळख कशी होईल ?**

सात्त्विक मानव देवतांचे पूजन करीत असतात. राजस मानव यक्ष राक्षसांचे तसेच तामस मानव भूत प्रेतांचे पूजन करीत असतात. ॥ ४ ॥

**हे भगवन् ! अश्रद्धाळू मानव ओळखण्याची चिन्हे काय आहेत ?**

अश्रद्धाळू मानव दम्भ, अहंकार, कामना, आसक्ती व बलाने युक्त होऊन, शास्त्रविधिरहित घोर तप करीत असतात आणि आपल्या पंचमहाभूतांच्या शरीराला तसेच माझ्या विरुद्ध आचरण करून अन्तःकरणामध्ये स्थित असणाऱ्या मलासुद्धा कष्ट देतात. अशा अज्ञानी मनुष्यांना तू आसुर स्वभाववान समज. ॥ ५-६ ॥

**आतापर्यंत आपण पूजन आणि तपाद्वारें श्रद्धाळू आणि अश्रद्धाळू मनुष्यांची ओळख करून दिली. परन्तु जे पूजन, तप इत्यादी करीत नाहीत, त्यांची ओळख कशाने होईल ?**

भोजनाच्या आवडीनुसार त्यांची ओळख होईल, कारण की. सर्वांना आहारसुध्दा तीन प्रकारचा आवडत असतो. त्याचप्रमाणे यज्ञ, तप आणि दानसुद्धा तीन प्रकारचे आवडते. त्यांचे हे प्रकार तू ऐक. ॥ ७ ॥

**सात्त्विक मनुष्याची आवड कोणत्या आहारामध्ये होत असते ?**

आयुष्य, सत्त्वगुण, बळ, आरोग्य, सुख आणि प्रसन्नपणा यांना वाढविणारे, स्थिर राहणारे, हृदयाला बळ देणारे, रसयुक्त आणि स्निग्ध— असे भोजनाचे पदार्थ सात्त्विक मनुष्याला आवडत असतात. ॥ ८ ॥

**राजस मनुष्याची आवड कोणत्या आहारांमध्ये होत असते ?**

अत्यन्त कडू, आंबट, खारट, अतिशय गरम, तिखट, नीरस आणि दाह करणारे भोजनाचे पदार्थ राजस मनुष्याला आवडत असतात जे दुःख, शोक आणि रोग उत्पन्न करणारे आहेत. ॥ ९ ॥

**तामस मनुष्याची आवड कोणत्या आहारात होत असते ?**

अर्धे शिजलेले, रसरहित, दुर्गन्धियुक्त (दारू, कांदा, लसूण, इत्यादी) शिळे, उष्टे आणि महान अपवित्र (मांस, मासे, अंडी इत्यादी) भोजनाचे पदार्थ तामस मनुष्याला आवडत असतात. ॥ १० ॥

**आता आपण, यज्ञ, तप आणि दानाचे सुद्धा तीन-तीन भेद ऐकण्याची आज्ञा दिली होती* म्हणून आता हे सांगा की, यज्ञ तीन प्रकारचा कसा होत असतो ?**

यज्ञ करणें कर्तव्य आहे—अशाप्रकारे मनाचे समाधान करून फलेच्छारहित झालेल्या मनुष्याकडून शास्त्रविधीनुसार जो यज्ञ केला जातो, तो सात्त्विक यज्ञ होय. ॥ ११ ॥

---

* प्रथम यजन-पूजन आणि भोजनाच्या द्वारे जी श्रद्धेची ओळख सांगितली, त्यापासून अज्ञानपूर्वक शास्त्रविधीचा त्याग करणारांची तर ओळख होते, पण जे मनुष्य शास्त्रविधीनुसार यज्ञादी शुभ कर्म करतात, त्यांची ओळख कशी होईल—हे सांगण्याकरिता भगवान श्रीकृष्णांनी यज्ञ, तप आणि दानाच्या तीन तीन भेदांना ऐकण्याची आज्ञा दिलेली आहे.

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! जो यज्ञ फळाच्या इच्छेनें अर्थात् आपल्यां स्वार्थाकरितां केला जाईल, अथवा केवळ लोकांना दाखविण्याकरिता केला जाईल त्याला तू राजस यज्ञ समज. ॥ १२ ॥

**तामस यज्ञ कसा होत असतो ?**

जो यज्ञ शास्त्रविधीने हीन, अन्न-दानाशिवाय, मंत्राशिवाय, दक्षिणेशिवाय आणि श्रद्धेशिवाय केला जातो, तो तामस म्हटला जातो. ॥ १३ ॥

**भगवन्ता ! आता हे सांगा की, तप किती प्रकारचे असते ?**

तप तीन प्रकारचे असते—शरीराचे, वाणीचे आणि मनाचे.देवता, ब्राह्मण, गुरुजन आणि जीवन्मुक्त महापुरुषांचे पूजन करणे, पाणी, माती इत्यादीनें शरीराला पवित्र ठेवणे, शारीरिक क्रियांना साधे-सरळ ठेवणे अर्थात् ऐट अक्कड न ठेवणे, ब्रह्मचर्याचे पालन करणे आणि शरीराकडून कोणालाही कोणत्याही प्रकारचे कष्ट न देणे हे शरीराचे तप आहे. ॥ १४ ॥

**वाणीचे तप कसे असते ?**

उद्वेग न करणारे, सत्य, प्रिय आणि हितकारक वचन बोलणे, स्वाध्याय करणे आणि अभ्यास (नाम-जप इत्यादी) करणे हे वाणीचे तप आहे. ॥ १५ ॥

**मनाचे तप कसे असते ?**

मनाची प्रसन्नता, सौम्य भाव, मननशीलता, मनाचा निग्रह आणि भावनांची शुद्धी हे मनाचे तप आहे. ॥ १६ ॥

उपर्युक्त तीन प्रकारचे तप जर परम श्रद्धेनें युक्त होऊन फलेच्छारहित मनुष्यांकडून केले जाईल, तर ते तप सात्त्विक तप म्हटले जाते. ॥ १७ ॥

**भगवन्ता ! राजस तप कोणते ?**

जे तप स्वतःच्या सत्कार, मान आणि पूजेकरिता अथवा दुसऱ्यांना दाखविण्याच्या भावनेने केले जाते, ते या लोकामध्ये अनिश्चित आणि नाशिवंत फल देणारे तप राजस होते. ॥ १८ ॥

**तामस तप कोणते ?**

जे तप मूर्खपणानें, हट्टानें, स्वतःला पीडा देऊन अथवा दुसऱ्यांना त्रास देण्याकरिता केले जाते, ते तामस तप होते. ॥ १९ ॥

**भगवन्ता ! आता हे सांगा की, दान तीन प्रकारचे कसे होत असते ?**

दान देणे कर्तव्य आहे, ह्या भावनेने जे दान प्रत्युपकाराच्या भावनेने रहित होऊन देश, काल आणि सुपात्र प्राप्त झाल्यानंतर दिले जाते. ते दान सात्त्विक होते. ॥ २० ॥

**राजस दान कोणते असते ?**

जे दान प्रत्युपकार मिळविण्याकरिता अथवा फळाची इच्छा ठेवून 'द्यावे लागत आहे' अशा दुःखी भावनेने दिले जाते. ते दान राजस होते. ॥ २१ ॥

**तामस दान कोणते ?**

जे दान सत्काराशिवाय तसेच अवज्ञापूर्वक, अयोग्य देश आणि काळात कुपात्रास दिले जाते. ते दान तामस होते. ॥ २२ ॥

**महाराज ! श्रद्धाळू मानवाने शास्त्रविहित यज्ञ, तप आणि दानाच्या क्रियांची सुरूवात कशी करावी ?**

ॐ, तत् आणि सत्—या तीन्ही नावांनी ज्या परमात्म्याचा निर्देश केला गेला आहे, त्याच परमात्म्याने सृष्टीच्या आरंभी वेद, ब्राह्मण आणि यज्ञ यांची निर्मिती केली आहे. म्हणून परमात्म्याचे नाव घेऊनच यज्ञादी क्रियांची सुरूवात केली पाहिजे. ॥ २३ ॥

**भगवन् ! ॐ चा प्रयोग कोठे होत असतो ?**

वैदिक सिद्धान्तांना मानणाऱ्या मानवांच्या शास्त्रविधीनें नियत अशा यज्ञ , दान आणि तपरूप क्रिया सतत 'ॐ' चा उच्चार करूनच सुरू होत असतात. ॥ २४ ॥

**'तत्' चा प्रयोग कोठे होत असतो ?**

'तत्' नावाने संबोधिल्या जाणाऱ्या परमात्म्याकरिताच सर्व काही आहे—असे मानून मुक्तीची इच्छा करणाऱ्या मानवांकडून फलेच्छा-रहित होऊन अनेक प्रकारच्या यज्ञ,तप आणि दानरूप क्रिया केल्या जातात. ॥ २५ ॥

**'सत्' चा प्रयोग कोठे होत असतो ?**

हे पार्था ! परमात्म्याच्या 'सत्' नांवाचा प्रयोग केवळ अस्तित्व आणि श्रेष्ठ भाव यामध्यें केला जातो. प्रशंसनीय श्रेष्ठ कर्माबरोबरसुद्धां 'सत्' जोडला जातो. यज्ञ, तप आणि दानांत मनुष्यांची जी स्थिती (निष्ठा, श्रद्धा) असते. ती सुद्धा 'सत्' म्हटली जाते. कोठपर्यंत सांगावे, त्या परमात्म्याकरिता जे कर्म केले जात असते. ते सर्व 'सत्' म्हटले जाते. ॥ २६-२७ ॥

**भगवन् ! असत् कर्म कोणते म्हटले जात असते ?**

हे पार्था ! अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान आणि केलेले तप, तसेच अन्यसुद्धा जे काही केले जाईल, ते सर्व 'असत्' म्हटले जाते. त्यांचे फळ येही मिळत नाही आणि मरणानंतरही मिळत नाही. अर्थात् त्याचे कोठेसुद्धा सत् फल मिळत नाही. ॥ २८ ॥



# अध्याय अठरावा

**अर्जुन म्हणाला—हे महाबाहो ! हे अन्तर्यामिन् ! हे केशिदैत्याला मारणाऱ्या श्रीकृष्णा ! मी संन्यास (सांख्ययोग) आणि त्याग (कर्मयोग) यांचे तत्त्व वेगळे-वेगळे जाणू इच्छित आहे.** ॥ १ ॥

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले—मी संन्यास आणि त्याग या विषयामध्ये दुसऱ्या दार्शनिक विद्वानांची चार मते सांगतो.

**महाराज ! ती चार मते कोणती आहेत ?**

१. काही विद्वान काम्य कर्मांच्या त्यागाला संन्यास म्हणतात.

२. काही सर्व कर्मफलांच्या त्यागाला त्याग म्हणतात.

३. काही विद्वान म्हणतात की, कर्मांना दोषाप्रमाणे सोडून दिले पाहिजे.

४. काही म्हणतात की, यज्ञ, दान आणि तपरूप कर्मांचा त्याग करू नये. ॥ २-३ ॥

**ही तर दार्शनिक विद्वानांची चार मते झाली, पण भगवन् ! आपले ह्या विषयात काय मत आहे ?**

हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुना ! संन्यास आणि त्याग या दोन्हींपैकीं तू प्रथम त्यागाच्या विषयातील माझे मत ऐक. कारण की, हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना ! त्याग तीन प्रकारचा सांगितलेला आहे. यज्ञ, दान आणि तपरूप कर्मांचा त्याग करू नये, उलट त्यांना जर करीत नसाल तर जरूर केले पाहिजे, कारण की, त्यांच्यापैकी एक एक कर्म बुद्धिमानांना पावन करणारे आहे. ॥ ४-५ ॥

**बस ! एवढीच कर्मे करणे आहेत काय ?**

हे पार्था ! आता सांगितलेल्या यज्ञ, दान आणि तपरूप कर्मांना तसेच त्यांच्याशिवाय दुसऱ्यासुद्धा शास्त्रविहित कर्मांना आसक्ती आणि फलाच्या इच्छेचा त्याग करून केले पाहिजे. हेच माझे निश्चित केलेले उत्तम मत आहे. ॥ ६ ॥

**भगवन्ता ! जो तीन प्रकारचा त्याग सांगितला आहे. त्याचे काय स्वरूप आहे ?**

नियत कर्माचा त्याग करणे कोणाकरिताही योग्य नाही.* मोहामुळे त्यांचा त्याग करणे तामस त्याग होय. ॥ ७ ॥

**राजस त्यागाचे काय स्वरूप आहे ?**

कर्तव्यकर्म करण्यामध्ये केवळ दुःखच आहे—असे समजून शारीरिक दुःखाच्या भीतीमुळें कर्मांचा त्याग करणे राजस त्याग होय. असा त्याग करणाराला त्यागाचे फल—शान्ती मिळत नाही. ॥ ८ ॥

**सात्त्विक त्यागाचे काय स्वरूप आहे ?**

हे अर्जुना ! नियत कर्म करणे मानवाचे आवश्यक कर्तव्य आहे—असे समजून कर्मांची आसक्ती आणि फलाची इच्छा यांचा त्याग करून कर्मे करणे हा सात्त्विक त्याग होय. ॥ ९ ॥

---

* विहित कर्म आणि नियत कर्म यांत काय फरक आहे तर शास्त्रांनी जी कर्मे करण्याची आज्ञा दिलेली आहे, ती सर्व 'विहित कर्म' म्हटली जातात, त्या सर्व विहित कर्मांचे पालण एक व्यक्ती करूच शकत नाही, कारण की, शास्त्रांत सर्व वार आणि तिथींच्या व्रताचे विधान आलेले आहे, जर एकच मनुष्य सर्व वार आणि सर्व तिथींमध्ये व्रत करील, तर मग तो भोजन केव्हा करील. यावरून हे सिद्ध झाले की मनुष्याकरिता सर्व विहित कर्मे लागू होत नाहीत. परन्तु त्या विहित कर्मामध्येसुद्धा वर्ण, आश्रम आणि परिस्थितीनुसार ज्याच्याकरिता जे कर्तव्य आवश्यक असते, त्याच्याकरिता ते 'नियत कर्म' होय. जसे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चारीहि वर्णांमध्ये ज्या ज्या वर्णाकरिता जीविका आणि शरीर निर्वाहासम्बन्धी जेवढे नियम आहेत त्या त्या वर्णाकरिता ते सर्व 'नियत कर्म' होय.

**भगवन् ! त्याग करणारा मनुष्य कसा असतो ?**

तो सकाम आणि निषिद्ध कर्मांचा त्याग तर करीत असतो, पण द्वेषानें नाही आणि शास्त्रनियत कर्तव्यकर्मांचे आचरण तर करीत असतो, पण आसक्तीने नाही. असा बुद्धिमान त्यागी मनुष्य सन्देहरहित होऊन आपल्या स्वरूपांत स्थित राहतो. ॥ १० ॥

**कर्में करण्यात आसक्ति नसावी आणि सोडण्यात द्वेष नसावा एवढी उठाठेव (खटपट) कराच का ? कर्मांचा सर्वथा त्यागच केला, तर ?**

देहधारी मनुष्याकडून कर्मांचा स्वरूपानें सर्वथा त्याग होऊच शकत नाहीं म्हणून जो कर्मांच्या फलाचा त्याग करणारा आहे, तोच त्यागी म्हटला जातो. ॥ ११ ॥

**भगवन्ता ! कर्मफल किती प्रकारचे असते ?**

कर्मफल तीन प्रकारचे असते. (१) इष्ट—ज्या परिस्थितीची मनुष्य इच्छा करतो. (२) अनिष्ट—ज्या परिस्थितीची मनुष्य इच्छा करीत नसतो. आणि (३) मिश्र—ज्याच्यामध्ये काही भाग इष्ट आणि काही भाग अनिष्ट असतो. या तीनही प्रकारचे कर्मफल, फलाची इच्छा धरून कर्म करणारांना मरणानंतरसुद्धा प्राप्त होते परन्तु फळेच्छेचा त्याग करणारांना कोठेही प्राप्त होत नाही.

**ज्या कर्माचे फळ तीन प्रकारचे असते. त्या कर्माच्या होण्यामध्ये हेतू कोण बनत असतो ?**

हे पराक्रमी अर्जुना ! कर्मांचा अन्त करणाऱ्या सांख्य-सिद्धान्तात सर्व कर्मे सिद्ध होण्यामध्ये पाच हेतु सांगितले आहेत. ते तू माझ्याकडून समजून घे ॥ १२-१३ ॥

**भगवन् ! ते हेतू कोणते आहेत ?**

शरीर, कर्ता, अनेक प्रकारचे करण आणि त्यांची अनेक प्रकारची

वेगळी-वेगळी क्रिया तसेंच संस्कार, हे पाच हेतू आहेत. मनुष्य हा शरीर, वाणी आणि मनाद्वारें शास्त्रविहित अथवा शास्त्रनिषिद्ध जे कोणतेही कर्म सुरू करतो, त्याचे हे पाच हेतू असतात. ॥ १४-१५ ॥

**कर्मांच्या होण्यामध्ये हे पाच हेतू सांगण्याचे तात्पर्य काय आहे ?**

कर्म तर शरीर, वाणी आणि मनाकडूनच होत असते, आत्म्यामध्ये कर्तृत्व नसते, परन्तु जो कर्माच्या विषयांत आत्म्याला कर्ता मानत असतो, तो दुर्बुद्धी मनुष्य यथार्थ जाणत नाही, कारण की, त्याची बुद्धी शुद्ध नसते. ॥ १६ ॥

**भगवन् ! आत्म्याला अकर्ता मानण्यामुळे काय होत असते ?**

ज्याच्यामध्ये 'मी करतो' असा अहंकृतभाव नसतो आणि ज्याची बुद्धी कर्मांच्या फळामध्ये लिप्त नसते, तो सर्व प्राण्यांना मारूनसुद्धा मारीत तर नाही आणि बद्ध होत नाही. ॥ १७ ॥

**जर कर्माबरोबर आत्म्याचा संबंध नाही तर मग कर्म कोणाच्या प्रेरणेने होते आणि कर्मामध्ये हेतू कोण बनतो ?**

ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता—या तीन्हींकडून कर्माची प्रेरणा होत असते तसेच करण, कर्म आणि कर्ता या तीन्हींकडून कर्मसंग्रह होत असतो. ॥ १८ ॥

**भगवन् ! कर्मप्रेरणा आणि कर्मसंग्रहामध्ये मुख्य कोण आहेत आणि त्यांचे मुख्य-मुख्य भेद कोणते आहेत ?**

गुणांच्या संबंधाने प्रत्येक पदार्थाच्या भिन्न-भिन्न भेदांची गणना करणाऱ्यां शास्त्रामध्यें गुणांच्या अनुसार ज्ञान, कर्म आणि कर्ता यांचे तीन-तीन मुख्य भेद सांगितले आहेत. तेसुद्धा तू योग्य प्रकारे ऐक. ॥ १९ ॥

**ज्ञानाच्या तीन भेदांपैकी सात्त्विक ज्ञान कोणते आहे ?**

ज्या ज्ञानाने साधक सर्व विभक्त प्राण्यांमध्ये विभागरहित अशा एका

अविनाशी सत्तेला पाहत असतो, ते ज्ञान सात्त्विक आहे. ॥ २० ॥

**भगवन् ! राजस ज्ञान कोणते आहे ?**

ज्या ज्ञानाने मनुष्य वेगळ्या-वेगळ्या सर्व प्राण्यांमध्ये वेगळे-वेगळे भाव पाहत असतो, ते ज्ञान राजस होय. ॥ २१ ॥

**तामस ज्ञान कोणते आहे ?**

जे उत्पन्न होणाऱ्या शरीरांतच पूर्ण असल्याप्रमाणे आसक्त आहे तसेच जे युक्तिसंगत नसते, तात्त्विक ज्ञानापासून रहित आहे आणि तुच्छ आहे, ते तामस ज्ञान होय. ॥ २२ ॥

**भगवन्ता ! तीन प्रकारच्या कर्मामध्ये सात्त्विक कर्म कोणते आहे ?**

जे नियत कर्म फलेच्छारहित मनुष्याकडून रागद्वेष आणि कर्तृत्व अभिमानरहित होऊन केले जाते. ते सात्त्विक कर्म होय. ॥ २३ ॥

**राजस कर्म कोणते आहे ?**

भोगांची इच्छा असणाऱ्या मनुष्याकडून अहंकार अथवा परिश्रमपूर्वक जे कर्म केले जाते, ते राजस कर्म होय. ॥ २४ ॥

**तामस कर्म कोणते आहे ?**

जे कर्म परिणाम, हानी, हिंसा आणि आपल्या सामर्थ्याला न पाहता मोहाने सुरू केले जाते, ते तामस कर्म होय. ॥ २५ ॥

**भगवन् ! तीन प्रकारच्या कर्त्यामध्ये सात्त्विक कर्ता कोणता आहे ?**

जो कर्ता आसक्तिरहित, अहंकाररहित, धैर्य आणि उत्साहयुक्त तसेच कर्माच्या सिद्धी आणि असिद्धीमध्ये निर्विकार राहत असतो, तो सात्त्विक कर्ता होय. ॥ २६ ॥

**राजस कर्ता कोणता आहे ?**

जो कर्ता आसक्तीने युक्त, कर्मफलाची इच्छा करणारा, लोभी,

हिंसास्वभावी असणारा, अशुद्ध आणि हर्ष-शोकाने युक्त आहे, तो राजस कर्ता होय. ॥ २७ ॥

**तामस कर्ता कोणता आहे ?**

जो कर्ता असावधान, कर्तव्य-अकर्तव्याच्या ज्ञानापासून रहित, ऐटश्रक्कड असणारा, जिद्दी, कृतघ्नी, आळसी, नेहमी खेद करणारा आणि दीर्घसूत्री (थोड्या वेळात होणाऱ्या कामालासुद्धा जास्त वेळ लावणारा) आहे, तो तामस कर्ता होय. ॥ २८ ॥

**ज्ञान, कर्म आणि कर्ता यांचे तीन तीन भेद तर आपण सांगितले आता त्यांच्याशिवाय आणिक कोण-कोणते भेद जाणणे आवश्यक आहे ?**

हे धनंजया ! कर्मसंग्राहक करणांमध्ये बुद्धी आणि धृती (धारणाशक्ती) मुख्य आहे, ज्यांचे भेद जाणण्याची फार आवश्यकता आहे. म्हणून आता तू गुणानुसार बुद्धी व धृतीचेसुद्धा तीन प्रकारचे भेद वेगळ्या-वेगळ्या रूपानें ऐक, जे मी पूर्णपणे सांगेन. हे पृथानन्दना ! प्रवृत्ती आणि निवृत्ती, कर्तव्य आणि अकर्तव्य, भय आणि अभय तसेच बन्ध आणि मोक्ष यांना जी बुद्धी योग्य प्रकारे जाणत असते. ती बुद्धी सात्त्विकी होय. ॥ २९-३० ॥

**राजसी बुद्धी कोणती आहे ?**

हे अर्जुना ! जी बुद्धी धर्म आणि अधर्माला, कर्तव्य आणि अकर्तव्यालासुद्धा योग्य प्रकारे जाणत नाही, ती राजसी बुद्धी होय. ॥ ३१ ॥

**तामसी बुद्धी कोणती आहे ?**

हे पृथानंदना ! तमोगुणानें वेढलेली जी बुद्धी धर्माला अधर्म आणि अधर्माला धर्म तसेच सर्व गोष्टींना उलटच मानत असते, ती तामसी बुद्धी होय. ॥ ३२ ॥

**भगवन् ! सात्त्विकी धृती कोणती असते ?**

हे अर्जुना ! समतायुक्त ज्या अव्यभिचारी धृतीद्वारां मनुष्य मन, प्राण आणि इंद्रियांच्या क्रियांना धारण करीत असतो ती धृती सात्त्विकी होय. ॥ ३३ ॥

**राजसी धृती कोणती असते ?**

हे पृथापुत्रा अर्जुना ! फलाची इच्छा करणारा मनुष्य, ज्या धृतीनें धर्म, अर्थ आणि काम (भोग) यांना अत्यन्त आसक्तीपूर्वक धारण करीत असतो ती धृती राजसी होय. ॥ ३४ ॥

**तामसी धृती कोणती असते ?**

हे अर्जुना ! दुष्ट बुद्धीचा मनुष्य ज्या धृतीद्वारा झोप, भय, शोक (चिन्ता), विषाद (दुःख) आणि मद (घमेण्ड) यांनासुद्धा सोडत नाही, ती धृती तामसी होय. ॥ ३५ ॥

**तामसी पुरुष निद्रा इत्यादींना का सोडत नाही ?**

त्याला सुख मिळाल्यामुळेच सोडत नाही.

**भगवन् ! ते सुख काय आहे ?**

हे भरतश्रेष्ठा अर्जुना ! त्या सुखाचेसुद्धा तीन प्रकार तू माझ्याकडून ऐक. ज्या सुखामध्ये अभ्यासामुळे रममाण होतो आणि ज्याने दुःखांचा शेवट होतो, असे ते परमात्मविषयक बुद्धीच्या प्रसन्नतेपासून उत्पन्न होणारे जे सुख सांसारिक आसक्तीमुळें आरंभी विषाप्रमाणे आणि परिणामामध्ये अमृताप्रमाणे असते, ते सुख सात्त्विक होय. ॥ ३६-३७ ॥

**राजस सुख कोणते असते ?**

जे सुख इंद्रियांच्या द्वारा विषयांच्या संबंधात सुरुवातीला अमृताप्रमाणे आणि परिणामामध्ये विषाप्रमाणे असते ते सुख राजस होय. ॥ ३८ ॥

**तामस सुख कोणते असते ?**

निद्रा, आळस आणि प्रमाद यांच्यापासून उत्पन्न झालेले जे सुख आरंभामध्ये आणि परिणामामध्ये स्वतःला मोहित करणारे असते. ते सुख तामस होय. ॥ ३९ ॥

**भगवन् ! आता हे सांगा की, तीन्ही गुणांसह आणिक कोणत्या कोणत्या वस्तूंचे तीन तीन भेद असतात ?**

पृथ्वीमध्यें, स्वर्गामध्ये, देवातांमध्यें तसेच यांच्याशिवाय आणखी कोठेही अशी कोणतीही वस्तू, पदार्थ इत्यादी नाहीत की, जे प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या या तीन्ही गुणांपासून रहित असतील अर्थात् सम्पूर्ण त्रैलोक्य तीन्ही गुणांमध्येच आहे. ॥ ४० ॥

**भगवन्ता ? या गुणांपासून सुटण्याचा उपाय काय आहे ?**

हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना ! या जगतांत ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य आणि शूद्र—हे चारी वर्णविभाग मनुष्याच्या स्वभावापासून उत्पन्न झालेल्या गुणांनुसारच केले गेलेले आहेत. म्हणून आपल्या-आपल्या वर्णाच्या अनुसार नियत कर्म करणेच गुणांपासून सुटण्याचा उपाय आहे. ॥ ४१ ॥

**भगवान् ! ब्राह्मणाचे कोणते कर्म आहे ?**

१. मनाचा निग्रह करणे, २. इंद्रियांना वश करणे ३. धर्म पालनाकरिता कष्ट सहन करणे, ४. अन्तर्बाह्य (अंतःकरणाने आणि शरीराने) शुद्ध राहणे ५. दुसऱ्यांच्या अपराधाची क्षमा करणे, ६. शरीर मन इत्यादीमध्ये सरळता ठेवणे ७. वेद, शास्त्र इत्यादींचे ज्ञान सम्पादन करणे. ८. यज्ञविधीला अनुभवांत आणणे, ९. परमात्मा, वेद, इत्यादीमध्ये आस्तिकभाव ठेवणे ही ब्राह्मणाची स्वाभाविक कर्मे आहेत. ॥ ४२ ॥

**क्षत्रियाची कोणती कर्मे आहेत ?**

१. शूरवीरता, २. तेज. ३. धैर्य, ४. प्रजेचे संचालन इत्यादीची विशेष चतुरता ५. युद्धामध्ये कधीही पाठ न दारवविणे, ६. दान देणे

आणि ७. शासन करण्याचा भाव (प्रवृत्ती) ही क्षत्रियाची स्वाभाविक कर्मे आहेत. ॥ ४३ ॥

**वैश्याची कोणती कर्मे आहेत ?**

१. शेती करणे, २. गायींचे रक्षण करणे आणि ३. शुद्ध व्यापार करणे—ही वैश्याची स्वाभाविक कर्मे आहेत.

**शूद्राचे कोणते कर्म आहे ?**

चारही वर्णांची सेवा करणे, हे शूद्राचे स्वाभाविक कर्म आहे. ॥ ४४ ॥

**भगवन्ता ! आप-आपली स्वाभाविक कर्मे केल्याने काय होत असते ?**

आप-आपल्या स्वाभाविक कर्मांमध्ये निष्कामभावानें तत्परतापूर्वक लागलेला मनुष्य परमात्म्याला प्राप्त करून घेत असतो. आपल्या स्वाभाविक कर्मामध्ये लागलेला मनुष्य ज्याप्रकारे परमात्म्याला प्राप्त होत असतो. तो प्रकार तू माझ्याकडून ऐक. ॥ ४५ ॥

**तो प्रकार काय आहे ?**

ज्या परमात्म्यापासून सर्व जगत् उत्पन्न झालेले आहे आणि ज्याने हे सर्व जगत् व्यापलेले आहे. त्या परमात्म्याचे आपल्या कर्मद्वारा पूजन करून मनुष्य सिद्धीला (परमात्म्याला) प्राप्त होतो. ॥ ४६ ॥

**भगवन् ! आपल्याच कर्मांचे अनुष्ठान का करावे ?**

भैय्या ! ज्याचा आपणाकरिता निषेध केला गेलेला आहे. अशा गुणांनी युक्त दुस-याच्या धर्मापेक्षा आपला दोषांनी युक्त धर्म (स्वाभाविक कर्म) श्रेष्ठ आहे. कारण की, स्वभावानें नियत केलेले स्वधर्मरूप कर्म करणारा मनुष्य पापाचा भागीदार होत नाही. हे कुन्तीनंदन अर्जुना ! दोषयुक्त असला तरी आपल्या धर्माचा त्याग करता कामा नये. कारण की, अग्नी पेटण्याच्या सुरुवातीला धूर होतच असतो, त्याचप्रमाणे प्रत्येक कर्माच्या सुरुवातीला कोणता ना कोणता तरी दोष होतच असतो. ॥ ४७-४८ ॥

**भगवन् ! कर्मांचा आंशिक दोष सुद्धा न लागेल, असा एखादा दुसरा उपाय आहे काय ?**

आहे, सांख्ययोग आहे. ज्याची बुद्धी सर्व ठिकाणी सर्वथा आसक्ति-रहित होत असते, ज्याचे शरीर ताब्यात असते आणि ज्याला कोणत्याही वस्तू इत्यादीची किंचित्सुद्धा पर्वा नसते असा मनुष्य सांख्ययोगाद्वारा नैष्कर्म्य सिद्धीला (ब्रह्माला) प्राप्त होतो अर्थात् त्याचे सर्व कर्म अकर्म होते आणि त्याला कर्मांचा आंशिक दोषसुद्धा लागत नाही. ॥ ४९ ॥

**त्या नैष्कर्म्य सिद्धीला प्राप्त करण्याचा काय क्रम आहे ?**

अन्तःकरणाच्या शुद्धिरूपी सिद्धीला प्राप्त झालेला मनुष्य ज्ञानाच्या परम निष्ठारूप असणाऱ्या ब्रह्माला ज्या ज्या क्रमाने प्राप्त होतो त्या क्रमाला तू माझ्याकडून संक्षेपानेच समजून घे. जो सात्त्विक बुद्धीने युक्त, वैराग्याचा आश्रित, एकान्तात राहण्याच्या स्वभावाचा आणि नियमित भोजन करणारा साधक धैर्याने इंद्रियांचे नियमन करून, शरीर वाणी, मनाला वश करून, शब्दादी विषयांचा त्याग करून आणि राग-द्वेष सोडून सतत परमात्म्याच्या ध्यानात लागलेला असतो. तो अहंकार, हट्ट, घमेण्ड, काम, क्रोध आणि परिग्रह (भोगबुद्धीने वस्तूंचा संग्रह) यांचा त्याग करून तसेच ममतारहित आणि शान्त होऊन ब्रह्म प्राप्तीकरिता पात्र होतो. ॥ ५०—५३ ॥

**भगवन्ता ! असा पात्र झाल्यानंतर काय होत असते ?**

तो ब्रह्मभूत अवस्थेला प्राप्त झालेला प्रसन्न मन असणारा साधक कोणाकरिता शोक करीत नाही आणि कशाची इच्छा करीत नाही. तसेच त्याचा सर्व प्राणिमात्रांमध्ये समभाव होतो. अशा साधकाला माझी पराभक्ती प्राप्त होते. ॥ ५४ ॥

**पराभक्ती प्राप्त होण्याने काय होते ?**

त्या पराभक्तीमुळे तो मी जो काही आहे आणि जसा आहे—अशाप्रकारे मला तत्त्वाने ओळखून तात्काळ माझ्यामध्ये प्रविष्ट होतो. ॥ ५५ ॥

**आपल्या प्राप्तीचा आणखीही कोणता अत्युत्तम उपाय आहे काय ?**

होय, फार चांगला उत्तम उपाय आहे.

**महाराज ! तो कोणता आहे ?**

जो अनन्यभावाने माझा आश्रय घेत असतो, तो भक्त सतत सर्व कर्मे करीत असूनसुद्धा माझ्या कृपेने निरन्तर राहणाऱ्या अविनाशी पदाला प्राप्त होतो. ॥ ५६ ॥

**तर मला काय केले पाहिजे ?**

तू केवळ मत्परायण होऊन सर्व कर्मांना चित्ताने मला अर्पण कर अर्थात् सर्व कर्म, पदार्थ इत्यादीपासून आपलेपणा काढून टाक आणि तू समतेला धारण करून निरन्तर माझ्यामध्ये मन लावणारा हो. ॥ ५७ ॥

**आपणामध्ये मन लावणारा होण्यामुळे काय होईल ?**

माझ्यामध्ये मन लावणारा होण्यामुळे तू माझ्यांकृपेने सर्व संकटे तरून जाशील, परन्तु जर तू अहंकारामुळे माझी गोष्ट मानणार नाहीस तर तुझे पतन होईल. ॥ ५८ ॥

**पतन कसे होईल ?**

अहंकाराचा आश्रय घेऊन तू युद्ध न करण्याचा जो निश्चय केलेला आहेस. तुझा तो निश्चय खोटा आहे. कारण की, तुझा क्षात्रस्वभाव तुला युद्धामध्ये लावीलच. हे कुन्तीनंदन अर्जुना! आपल्या स्वभावजन्य कर्माने बांधलेला तू मोहामुळे जे युद्ध करू इच्छित नाहीस, ते तू क्षात्र स्वभावाच्या अधीन होऊन करशील. ॥ ५९-६० ॥

**महाराज ! तो क्षात्रस्वभाव युद्धरूपी कर्म कसे करवील ?**

हे अर्जुना ! अन्तर्यामी ईश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित आहे. तो आपल्या मायेंने शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या सर्व प्राण्यांना त्यांच्या स्वभावानुसार फिरवित असतो. ॥ ६१ ॥

**या पारतंत्र्यातून निघण्याचा उपाय काय आहे ?**

हे भरतवंशातील अर्जुना ! तू सर्वभावाने त्या अन्तर्यामी ईश्वरालाच शरण जा. त्याच्या कृपेने तुला संसारापासून सर्वथा उपरती आणि अविनाशी परमपदाची प्राप्ती होईल. मी हे गुप्ताहून अत्यन्त गुप्त शरणागतिरूप ज्ञान तुला सांगितले. आता तू याच्यावर चांगल्याप्रकारे विचार करून जसे आवडेल, तसे कर. ॥ ६२-६३ ॥

**भगवन्ता ! मी तर माझ्या इच्छेनुसार काही करू इच्छित नाही, आपणच सांगा की. मी काय करू ?**

तर तू माझे हे सर्व गुह्याहून अत्यन्त गुह्य परम वचन पुन्हा ऐक. तू माझा अत्यन्त आवडता आहेस. म्हणून मी तुझ्या हिताची गोष्ट सांगेन. ॥ ६४ ॥

**भगवन्ता ! ती हिताची गोष्ट काय आहे ?**

तू माझा भक्त हो, माझ्यामध्ये मन लावणारा हो, माझे पूजन कर आणि मलाच नमस्कार कर. असे करण्यामुळे तू मलाच प्राप्त होशील. ही मी तुझ्यासमोर सत्य प्रतिज्ञा करतो. कारण की, तू माझा अत्यन्त आवडता आहेस. ॥ ६५ ॥

**भगवन् ! जर मी असे करू शकलो नाही, तर ?**

सर्व धर्मांचा आश्रय सोडून तू केवळ एक मलाच शरण ये, मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. तू चिन्ता करू नकोस. ॥ ६६ ॥

**भगवन्ता ! ही तर आपण फारच सोपी आणि चांगली गोष्ट सांगितली, ही गोष्ट मी सर्वांना सांगू शकतो का ?**

नाही, नाही भैय्या ! अत्यन्त गोपनीय गोष्ट असहिष्णु मनुष्याला सांगू नकोस, जो माझा भक्त नाही त्यालासुद्धा कधी सांगू नकोस, जो या गोष्टीला ऐकू इच्छित नाही, त्यालासुद्धा सांगू नकोस आणि जो माझ्यामध्ये दोषदृष्टी ठेवतो, त्यालासुद्धा सांगू नकोस. ॥ ६७ ॥

**पण याच्याशिवाय आपण जे आणिक शास्त्र सांगितले आहे. ते कोणाला सांगितले पाहिजे ?**

माझ्या भक्तांना सांगितले पाहिजे . जो मनुष्य माझ्या पराभक्तीच्या उद्देशाने ह्या परम गोपनीय गीता ग्रंथाला माझ्या भक्तामध्ये सांगेल तो निःसंशयपणे मलाच प्राप्त होईल. इतकेच नाही, मनुष्यामध्ये त्याच्यासमान माझे अत्यन्त आवडते कार्य करणाराही कोणी नाही आणि ह्या भूमण्डलावर त्याच्यासारखा माझा आवडतासुद्धा कोणी होणार नाही. ॥ ६८-६९ ॥

**जर कोणी असे कार्य करू शकत नसेल, तर ?**

जो माझ्या आणि तुझ्या ह्या धर्ममय संवादाचे अध्ययनही करील, तर त्याच्याकडून मी ज्ञानयज्ञाने पूजित होईन. असे माझे मत आहे. ॥ ७० ॥

**भगवन् ! कोणी अध्ययनसुद्धा करू शकले नाही. तर ?**

दोषरहित झालेला जो मनुष्य केवळ श्रद्धापूर्वक माझ्या या उपदेशाला ऐकेल तरीही तोसुद्धा सर्व पापांपासून मुक्त होऊन पुण्यवंताच्या उच्च लोकांना प्राप्त होईल ॥ ७१ ॥

**हे अर्जुना ! मी तुला हे विचारतो की, तू या उपदेशाला एकाग्रचित्ताने ऐकलेस का ? आणि हे धनंजया ! तुझा अज्ञानामुळे उत्पन्न झालेला मोह नष्ट झाला का ? ॥ ७२ ॥**

अर्जुन म्हणाला—हे अच्युता ! माझा मोह नष्ट झालेला आहे आणि स्मृती प्राप्त झालेली आहे. पण हे सर्व झाले आहे ते आपल्या कृपेमुळे, उपदेश ऐकल्यामुळे नाही. मी सन्देहरहित होऊन स्थित आहे. आता मी आपल्या आज्ञेचे पालन करीन. ॥ ७३ ॥

संजय म्हणाला—हे राजन्! अशाप्रकारे मी भगवान वासुदेव आणि महात्मा अर्जुन यांचा हा रोमांचकारी अद्‌भुत संवाद ऐकला. ॥ ७४ ॥

**संजया ! हा संवाद तुला ऐकण्यास कसा मिळाला ?**

हा अत्यन्त गोपनीय संवाद मी व्यासांच्या कृपेनें साक्षात् योगेश्वर भगवान श्रीकृष्ण सांगत असताना ऐकला आहे. परंपरेने नाही. ॥ ७५ ॥

**संजया ! हा संवाद ऐकल्यामुळें तुझ्यावर काय परिणाम झाला ?**

हे राजा धृतराष्ट्रा ! भगवान श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या ह्या पवित्र आणि अद्भुत संवादाची आठवण करून करून मी पुन्हा पुन्हा आनन्दित होत आहे. ॥ ७६ ॥

**आनंदित होण्याचे आणखी काय कारण आहे ?**

हे राजा धृतराष्ट्रा! भगवान श्रीकृष्णांच्या त्या अत्यन्त अद्भुत अशा विराट स्वरूपाची आठवण करून मला मोठे आश्चर्य होत आहे आणि मी पुन्हा पुन्हा आनन्दित होत आहे. ॥ ७७ ॥

**संजया ! आता तू कोणत्या निर्णयास पोहचला आहेस ?**

जेथे योगेश्वर भगवान श्रीकृष्ण आहेत आणि जेथे गाण्डीव धनुष्यधारी अर्जुन आहे, तेथेच श्री, विजय, विभूती, आणि अचल नीती आहे हा माझा निश्चय आहे. ॥ ७८ ॥

—o—

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

हरिः ॐ तत्सत् हरिः ॐ तत्सत् हरिः ॐ तत्सत्

